॥ श्रीशंकर ॥

— ऐतिहासिक साग्र संगीत —

# 'तुरुंगाची यात्रा'

अंकै १ ते ४

लेखकः—

हरिश्चंद्र सदाशिव नांदविडकर उर्फ 'नाईक'

गुलामांचा देव, मर्दांची जात, धर्मरक्षण, हरामी पैसा, दर्यावरचा दरारा, वगैरे नाटकांचे कर्ते.

★

किंमत दीड रुपया

२७ वि. नेरॉय हाऊस, खोताची वाडी गिरगाव मुं ४

प्रिंटर: —
बॉम्बे सेंट्रल प्रेस
मुरलीधर टेंपल कंपौंड,
ठाकुरद्वार मुंबई २.



**खास सूचना:—**

या नाटकाचा प्रयोग तिकीट लावून असो कीं मोफत असो अ खासगी असो नाटककाराची लेखी परवानगी घ्यावी. नाटककाराची ले परवानगी घेतल्यावांचून या नाटकाचा प्रयोग करणारावर कायदेशीर इल करण्यांत येईल.

# - सुमनांजली -

सुप्रसिद्ध "**केशव संगीत मंडळी**" त नट म्हणून काम करीत असतांना "**तुरुंगाची यात्रा**" हें नाटक मी लिहिलं व त्याच मंडळीकडून या नाटकाचे दोन प्रयोग यशस्वी रितीनं मु. येवला येथें रंगभूमीवर आणले गेले. नंतर औरंगाबादेला मंडळीचा मुक्काम जातांच औरंगजेबाचा व शिवाजी महाराजांचा जसा खटका उडाला, तसाच प्रसग या नाटकाच्या नशीबीं आला. कारण शिवाजी ज्या नाटकांत असेल तें नाटक करायचं नाहीं असा सक्त निर्बंध मंडळीवर घालण्यांत आला, आणि त्यामुळं नुकतंच रंगभूमीवर आलेलें हें माझं नाटक अर्थातच बंद पडल. व या मोंगलाई प्रदेशांचा बरोबर मोंगलाई अनुभव मला आला. पुढें मोंगलाइतच ही मंडळी विराम पावली.

कै. केशवराव भोंसले यांचे थोरले बंधू श्री. दत्तोपंत भोंसले यांनींच मला रंगभूमीचा मार्ग दाखविला आणि माझ्या हातून जी कांहीं रंगभूमीची अल्प सेवा झाली ही देखील त्यांचीच कृपा मानून मी त्याचे आभार मानीत आहे.

पहिल्या आवृत्तीच्या प्रकाशनाच्या बाबतींत श्री. लक्ष्मणराव गायथळे यांची मदत झाली होती. तशी या दुसऱ्या आवृत्तीचे वेळीं 'बॉम्बे सेंट्रल प्रेस'चे हुशार चालक, श्री. पी. जे. देसाई, व माझे धाकटे बंधु श्री. गणपतराव नांदगांवकर यांची झाली आहे. तेव्हां त्यांचे आभार मानणें भाग आहे. तसेंच ज्या व्यक्तींचें मला सहाय्य झालें आहे त्या प्रत्येकांचे आभारही मी मानीत आहे.

नाट्य-रसिक लोकांनीं माझ्या या नाटकाला जो उदार आश्रय दिला व अद्याप देत आहेत व पुढेंही देतील अशी मला आशा आहे आणि यांतच माझं समाधान आहे तेव्हां त्यांचेही आभार मानणें जरूर आहे.

**ह. स. नाईक**

या नाटकाचा प्रयोग " **नाट्य झंकार** " लौकरच रंगभूमीवर नव्या स्वरूपांत आणणार आहे त्यावेळीं कामें करणारी मंडळी.

| | | |
|---|---|---|
| शिवाजी | .... | श्री. शंकरराव बिडये |
| तानाजी | .... | ,, शांताराम खामकर |
| हिरोजी | .... | ,, विश्वनाथ गोवेकर |
| हंबीरराव | .... | ,, शामकांत हलनकर |
| मानाजीराव | .... | ,, गणपतराव नांदविडकर |
| दौलत | .... | ,, अनंत वासुदेव |
| नभाजीराव | .... | ,, दिगंबर गव्हाणकर |
| प्रताप | .... | मा. विजयकुमार |
| सुभानराव | .... | बी. तुकाराम |

## स्त्री पात्रें

| | | |
|---|---|---|
| जयंती | .... | कु. दुर्गा नागेशकर |
| लक्ष्मी | .... | कु. इंदुमती दळवी. |

---

| | |
|---|---|
| हार्मोनियम व संगीत | श्री. राजाभाऊ कोसके |
| तबलजी | ,, वसंत कालेकर |
| फीडल | ,, जी. जी. पाटील |
| ट्रम्पेट | ,, हरीश देसाई |
| क्लारोनेट | ,, महादेव पांचाल |
| ढोलक | ,, सोमेश्वर नागपुरे |
| बासरी | ,, दत्ताराम करावडे |
| ड्रेसमकर व मेकप | ,, एम. बी. सावंत, एस. बी. सुर्वे |
| दिग्दर्शक | ,, गणपतराव नांदविडकर |

# पहिल्या आवृत्तीची
# प्रस्तावना

लहानपणीं शाळेच्या रम्य वातावरणांत वावरत असतांना, गॅदरिंग व इतर समारंभाप्रीत्यर्थ होणारे नाट्यप्रयोग पाहून आपण एखादं नाटक लिहावं असं मला वाटूं लागलं. नाटकाकरितां कुठलं कथानक निवडावं याची कित्येक वर्षांपर्यंत नुसती विचारमालिकाच चालू होती. मध्यंतरीं बरेच प्रसंग व अनेक कथानकें दृष्टी खालून गेलीं, पण कुठलं पसंत करावं तेंच मुळीं सुचेना. माझ्या मनाचा कल वीर–रसाकडे झुकत असल्यामुळं, शेवटीं शिवकालीन नाटकाची कल्पना जास्त पसंत केली. कारण "**श्री छत्रपती शिवाजी महाराज**" या अलौकिक व्यक्तीबद्दल लोकांत असलेल्या आदरामुळं मी त्यांच्याकडे जास्त आकर्षिला गेलों. शिवाजी महाराजांचें चातुर्य, त्यांचा मुत्सद्दीपणा त्यांची न्यायप्रियता व पदोपदीं दिसून येणारं अजब साहस यांनीं तर माझी मति गुंगच होऊन गेली आणि मला विशेष आनंद जर कशाबद्दल झाला असेल तर महाराजांनीं गुप्तहेराची अजब व बहुमोलाची पद्धत शोधून काढली त्याबद्दल. गुप्तहेरखातं किती उपयोगाचं असतं याचा प्रत्यय त्यावेळीं दिसून आलाच पण चालू घडीला देखील या हेरगिरीचा उपयुक्तपणा राजकीय लोकांना पटला आहे व ते या कलेचा योग्य तो फायदा घेत आहेत. शिवाजी महाराजांनीं ही पद्धत प्रथम शोधून काढून स्वराज्यस्थापनेच्या कामीं तिचा अतिशय उपयोग करून घेतला. पण दुर्दैवाची गोष्ट ही कीं, हें हेरखातें महाराजांच्या पश्चात बहुतेक नामशेष झालेलं दिसून येतं. या उपयुक्त कलेला नंतर कुणी उत्तेजनच दिलेलं दिसून येत नाहीं. पुढं तिचं नांवसुद्धां ऐकूं येईनासं झालं. माझ्या अल्पमतीला वाटतं कीं, मराठ्यांच्या ऱ्हासाला या कलेची अवहेलनाच कारणीभूत झाली असावी. असो. या नाटकाचा काळ ज्यावेळीं शिवाजी महाराज अवरंगजेबाच्या भेटीला आग्र्याला गेले होते त्यावेळचा कल्पिला आहे. त्यावेळीं महाराष्ट्र जनतेंत कोणत्या वातावरणाचं वारं वहात

होतं, त्यांची मनःस्थिती कशा प्रकारची होती, त्यांच्या मनोभावना कोणत्या विचारांनीं व कृतींनीं रंगून गेल्या होत्या, याचं अल्पसं चित्र रेखाटण्याचा प्रयत्न मी या नाटकांत केला आहे. व त्यावेळेच्या परिस्थितीचा चालू परिस्थितीशीं किती सुंदर मेळ कसा बसतो हें या नाटकांत मी दाखविलं आहे. माझा हा प्रयत्न कसा काय जमला आहे हें ठरविण्याचं मी जनताजनार्दनाच्या मर्जीवरच ठेवून ही अल्पशी प्रस्तावना पुरी करतों.

**मालाड**

आपला नम्र,
**ह. स. नाईक**
१४–१–४०

## दुसरी आवृत्ती

या आवृत्तींत फक्त फोटो बदलण्या खेरीज कुठलाहि फेरफार केलेला नाहीं. वास्तविक दुसरी आवृत्ती काढण्याचा योग फार लवकर आला होता पण अशाच कांहीं कारणानें तो लांबणीवर पडत गेला त्याला नाईलाज आहे.

पहिल्या आवृत्तीच्या वेळीं जसा जनतेकडून उदार आश्रय मिळाला आणि माझ्या या पहिल्या कृतीचें कौतुक केलं गेलं याबद्दल मी फार ऋणी आहे. या ही आवृत्तीला तसाच उदार आश्रय देतील अशी आशा बाळगतो.

२९ शुक्रवार, शर्मा बिल्डिंग
पुणें २

**ह. स. नाईक**
१–६–५१

॥ श्रीशंकर ॥

# " तुरुंगाची यात्रा "

## अंक १ ला.

प्रवेश १ ला ] [ स्थळः-माळ-रान.

[ रात्रीच्या वेळीं शेतकरी मंडळी टेहळणी करीत आहेत. ]

शेतकरीः—

अभंग.

घ्या हो विठोबाचें नांव ॥ मनीं ठेवा निर्मळ भाव ॥
पावे वैकुंठीचा राव ॥ जगीं नित्य काळीं ॥१॥
गाजे याची ख्याती मोठी ॥ धांव घेई भक्तासाठीं ॥
सत्वा पाही तो जगजेठी ॥ दुःख देऊनी ॥२॥
माया संसाराची मोठी ॥ दावी आम्हां आशा खोटी ॥
अंतीं रडवी ठाई ठाई ॥ कुणा सौख्य नाहीं ॥३॥
देवावरी ठेवुनी भार ॥ पाहूं संचिताचें सार ॥
भवसिंधू करील पार ॥ भजा पांडुरंग ॥४॥

धांवा, धांवा, चोर, चोर, धांवा हो धांवा. ( आंतून सुभानराव ओरडतो. )

१ ला शेतकरीः—हा तर सुभानरावाचा आवाज.

२ रा शेतकरीः—अरे बघतां काय ? चला चोरट्यांसनीं चांगलं ठेचूं या.

सर्वजणः—जय भवानी, हर हर महादेव. [ धांवत जातात. ]

## प्रवेश २ रा

**स्थळः**--सुभानरावाची झोंपडी.

[ चोर सुभानरावाला मारीत झोंपडीच्या बाहेर आणीत आहेत. ]

**सुभानः**--नका हो नका मला मारूं.

**१ ला चोरः**--मग पैसा काढ अगोदर.

**सुभानः**--माझ्यासारख्या गरिबाच्या घरांत पैसा कसला असणार ?

**२ रा चोरः**--तुझ्यासारख्या बाहेरून कंगाल दिसणाऱ्या शेतकऱ्याच्या घरांतच पुष्कळ पैसा असतो. चल दाखीव.

**सुभानः**--काय कपाळ दाखवूं माझं ?

**१ ला. चोरः**--हरामखोरा, खोटं बोलून आम्हांला फसवूं पहातोस ?

**२ रा. चोरः**--जमिनींत पुरलेला, नाहींतर भिंतींत चिणून ठेवलेला पैसा शेतकऱ्याच्या घरात असतो, असा आमचा अनुभव आहे. तुम्हीं शेतकरी बडे लबाड, ठग आहांत ठग !

**१ ला. चोरः**--चल जलदी कर. मुडद्यासारखी दांतखिळी कां बसली ?

**सुभानः**--शंभु महादेवाची शपथ, घरांत एक शिवराईसुद्धां नाहीं हो.

**२ रा. चोरः**--हा बेवकूब अशानं नाहीं कबूल व्हायचा. उडीव कोरडे याच्या पाठीवर, मग पहा कसा बोलूं लागेल. ( कोरडे मारूं लागतात सुभानराव ओरडूं लागतो. )

**सुभानः**--अग आई ग........दया करा, माझ्यावर दया करा.

**१ ला. चोरः**--झक् मारते दया. आमची दया माया म्हणजे पैसा.

**२ रा चोरः**--पैसा काढ अगोदर. मग करतो दया. अरे ए लगाव जोरसे ( पुन्हां कोरडे मारूं लागतो. सुभानराव जास्त मोठ्यानें ओरडूं लागतो. )

**सुभानः**--धांवा हो धांवा, या चोरांच्या हातून मला सोडवा.

**२ रा चोरः**--कोण येणार तुला सोडवायला ? कुणी येईल त्याला छाटून टाकूं ( आंतून मोठ्यानें गलबला ऐकूं येतो. धरा, मारा, ठोका या चोरांना. हुश्शार. जय भवानी, हर हर महादेव. )

**१ला चोरः**--अरे बापरे ! हे पिसाळलेले लोक इकडेच येत आहेत, आतां ?

**२ रा चोर**:—पळ, पळ लौकर. मिळालं तितकं पुरे झालं.

(चोर एका बाजूनें पळून जातात आणि दुसऱ्या बाजूनें शेतकरी धांवत येतात)

**१ ला शेतकरी**:—कुठं आहेत ते पाजी लुटारू ?

**सुभान**:—ते पहा—

**५ वा शेतकरी**:—चला मर्द हो ! या बदमाषांचा पाठलाग करून त्यांना पकडून आणू या.

**सर्वजण**:—जय भवानी, हर हर महादेव ! ( धांवत जातात व एक म्हातारा मागें रहातो )

**म्हातारा**:—आजकाल या चोरांना बरंच फावलंय. अररर, सुभानराव तुमच्या घराची नासधूस केली की यानीं.

**सुभान**:—कर्म माझं.

**म्हातारा**:—असे निराश होऊं नका. कर्माला दोष देऊन काय व्हनार हाये ? आपुनच आपलं रक्षण करायला खंबीर झाल्यावांचून निभाव लागायचा नाई.

( चोर न सांपडल्यामुळं निराश झालेले शेतकरी परत येतात )

**३ रा शेतकरी**:—हे चोर लई बिलंदर, कुठल्या कुठं गडप झाले !

**तोतरा शेतकरी**:— बे....बे....बेट्यांचं न....नशीब........मो....मो........मोठं दिसतंय !

**मुलगा**:—अर पळाले म्हणून सुटले, नाहींतर दाखवलं असतं या तलवारीचं पाणी !

**म्हातारा**:—आतां असं करा सुभानराव, मानाजीराव मान्यांकडे जाऊन दाद मागा.

**सुभान**:—मान्यांकडे जाऊं !

**१ ला शेतकरी**:—आपले महाराज तुरुंगांत अडकल्यापासून हे बेटे माने फारच चढेल..........

**२ रा. शेतकरी**:—अर लई मगरूर बनले हायती.

**३ रा. शेतकरी:**--अन् सरदारीच्या डौलानं शेफारल पन् हायती.

**म्हातारा:**—अर का नाई चढणार ? वरचा कुनी इचारनार नसला कीं असं व्हायचच.

**तोतरा:** — क....क....क....काय....बे....बेव्याची...इ....इ....इर्क्षी तरी !

**२ रा शेतकरी:**--पन चोरट्यांना फावलय गड्या याच्या अमदानींत.

**५ वा शेतकरी:**--याचीच फूस असावी चोरांना. नाहींतर इतका बोभाटा चाललाया तरी याचं आपलं त्वांड मिटलेलच.

**तोतरा:**--ख....ख....खरं हाय ग....ग...गड्या.

**५ वा शेतकरी:**--हे घरचे काळ, आपल्याच लोकांच्या मानेवर बसायचे.

**सुभान:**--मग मान्यांकड जाऊन तरी-

**म्हातारा:**—असं बघा सुभानराव, आपुन पडलो गरजू, तवां दाद मांगाया काय हरकत हाये ?

**५वा शेतकरी:**—तकड काई झाल नाहीं तर हंबीरराव मोहित्यासनी भेटा.

**२ रा शेतकरी:**—तिथं मात्र तुमची दाद लागल्यावांचून रहाणार नाहीं.

**तोतरा:**—ख....ख....खरा म....मर्द आहे....तो....तो....तो.

**मुलगा:**—कैकवेळां मानाजीची त्याची जुंपली आहे.

**म्हातारा:**—लाखांत नांव काढील असा जवानमर्द आहे तो. खात्रीनं कायभी उपाय सांगल.

**३ रा शेतकरी:**--या वेळीं जर आपले शिवाजी महाराज असते तर ?

**२ रा शेतकरी:**—देवा ! आमच्या शिवाजी राजांना तुरुंगांतून लौकर सोडीव.

**मुलगा:**--हंबीररावासारख्या माणसांना सामर्थ्य दे.

**५ वा. शेतकरी:**—मानाजीरावाचा अगदीं सत्यानाश करून टाक.

**२ रा. शेतकरी:**--देवा ! आमच्या देशाला या चोरांच्या त्रासांतून लौकर मुक्त कर.

**म्हातारा:**—म्हणारे-

**सोरजणः**— अभंग

ध्याहो विठोबाचं नांव ॥ मनीं ठेवा निर्मल भाव ॥
पावे वैकुंठीचा राव ॥ जगीं नित्य काळीं ॥ १ ॥
देवावरी ठेवुनी भार ॥ पाहूं संचिताचें सार ॥
भवसिंधू करील पार ॥ भजा पांडुरंग ॥ २ ॥

( पडदा. )

---

## प्रवेश ३ रा

( स्थळः—मानाजीरावांच्या वाड्याची देवडी )

[ दौलतराव पहारा करीत आहे ]

**दौलतः**—मानाजीराव मान्यांचा मी नोकर ! आमची ही स्वारी पक्की कारस्थानी आणि धोरणी. त्यांनीं मला सांगून ठेवलं आहे, कीं हजार युक्त्या कर, आणि ती नभाजीची पोरगी जयंती, तिच्याशीं बोलण्याचा मोका जुळवून आण. त्यावेळेपासून माझी सारखी खटपट चालू आहे, पण संधी कांहीं सांपडत नाहीं. ( लांब अंतरावरून जयंती जात असलेली दिसते. ) आं ! हें काय ? जयंती ? कुठं चालली आहे ही इतक्या सकाळीं अन् गडबडीनं ? बरोबर कोण आहे–धाकटा भाऊ ? हां. हां. आपल्याला पाहिजे असलेली संधी याच वेळीं बरी आहे ! या कामगिरीबद्दल मानाजीरावांकडून चांगलं बक्षीस मागायला......

( सुभानराव ओरडत प्रवेश करतो )

**सुभानः**—दाद द्या दाद.

**दौलतः**—हें द्या बक्षीस–बक्षिसाचं नांव काढतांच बक्षीस कसं पटकन तयार.

**सुभानः**—सरकार दाद द्या दाद.

**दौलतः**—सरकार गेले आहेत शिकारीला.

**सुभानः**—मग आमचीच कां ते शिकार करीत नाहींत ?

**दौलतः**—ए, जीभ आवरून धरतोस कीं दाखवूं माझा शिपाईबाणा ! कायरे, आम्हीं शिपाई म्हणजे तुम्हांला केरकचरा वाटतो नाहीं ? अरे आम्हीं

शिपाई राज्यकर्त्यांचे डोळे आहेत डोळे ! आम्हां शिपायांना योग्य तो मान दिला पाहिजे, बडी बडदास्त ठेवली पाहिजे ! नुसता साधा शिपाई असला, तरी त्याला नाईकसाब म्हणून असा लवून मुजरा करायचा असतो.

**सुभानः**—संकटांच्या साडेसातींत सांपडलेल्या गरीब जीवांना मान-पानाचे प्रसंग कुठून सुचणार ?

**दौलतः**—या तुझ्या तर्कटानं माझं डोकं फिरूं लागलं आहे. शहाणा असशील तर घरीं जाऊन स्वस्थ झोंप कसा !

**सुभानः**—कुठं झोपूं ? चोरांनीं माझ्या घरावर दरोडा घातला, मला लुटलं म्हणून दाद मागायला मी इथं आलों आहे. मग तुम्हींच सांगा मी कुठं बरं झोपूं ?

**दौलतः**—मसणांत. मसणांत तर जागा आहे ना ?

**सुभानः**—नाईकसाब, माझी दाद मानाजीरावाजवळ पोंचवा हो ! मी तुमच्या पायां पडतो. पदर पसरतो ( गुडघे टेंकतो. )

**दौलतः**—( त्याच्यापुढें गुडघे टेकीत ) मी तुझ्या पायां पडतो, पदर पसरतों, वर आणखी हात पण जोडतों, माझी दाद तूंच ऐक.

**सुभानः**—कसली तुमची दाद ?

**दौलतः**—एक शब्दसुद्धां न बोलतां तूं मुकाट्यानं निघून जा, हीच माझी दाद. अरे आमचा रिवाज ठाऊक नाहीं तुला ? का ठाऊक नसल्याचं ढोंग करीत आहेस ? बरं ऐक. मालकाची भेट पाहिजे असल्यास, अगोदर त्याच्या नोकराची भेट घेऊन त्याची मूठ चांगली भरावी लागते. शंकराच्या दर्शनाला जायच्या अगोदर, नंदीचं दर्शन घ्यावं लागतं ! नोकर चांगला खूष झाला, कीं मालक लवकर भेटतो; आणि काम पण कसं पटकन होतं. मग बोल, काय देणार मला ?

**सुभानः**—काय देऊं ? होतं नव्हतं तें सगळं चोरांनीं लुबाडून, मला कंगाल करून सोडलं आहे, आणि त्याचीच दाद मागण्याकरितां मी तुमच्यासमोर उभा आहे.

**दौलतः**—मग इथून अगोदर चालता हो. जातोस कीं नाहीं ! नाहीं ? ( तलवार उपसून त्याच्या अंगावर मारायला जातो, पण सुभानराव अगदीं

न घाबरतां एखाद्या पुतळ्याप्रमाणें स्तब्ध उभा राहतो, तें पाहून तो स्वतःच घाबरतो. ) आं-? कायरे, तूं भ्याला नाहींस कुठं ?

**सुभानः** - कशाला भिऊं ?

**दौलतः**--कशाला भिऊं !

**सुभानः**--जिवंत राहून या अशा हालअपेष्टा भोगण्यापेक्षां तुमच्या तरवारीला बळी पडलेलं काय वाईट ?

**दौलतः**—असं काय ? बरं जा. तुझ्यावर दया करतों मी, ( स्वगत ) आपल्याला तलवार चालविण्याचं धाडस होत नाहीं. उसनं अवसान दाखवायला गेलों, तों याच्या खंबीरपणामुळं चांगलाच तोंडघशीं पडलों. (उघड) कायरे, आतां तरी जातोस कीं नाहीं ? कां....( सुभानरावाला मारूं लागतो, तो ओरडूं लागतो, तोंच मानाजीराव माने प्रवेश करतात. )

**मानाजीः**--दौलत, देवडीजवळ कसली दंगल माजविली आहेस ही ?

**दौलतः** - आपल्याच हुकमाची अंमलबजावणी करतों आहें सरकार !

**मानाजीः**—शाबास दौलत, तूं खरोखर इमानी नोकर आहेस. हा कोण तुझ्याबरोबर हुज्जत घालतो आहे ? कशाकरितां आला इथं हा ? कायरे ए, ही धर्मशाळा आहे वाटतं ?

**सुभानः**—सरकार, मी गरीब माणूस आपल्याकडे दाद मागायला आलों आहें. पण आपण यायच्या अगोदर, आपल्या या इमानी नोकरानं, मला लाथाबुक्यानीं मारून माझी चांगलीच दाद घेतली हो !

**मानाजीः**--दौलत, फार..........फार शेफारला आहेस तूं ! बोल, या गरीब मनुष्याला कां मारलंस तूं ?

**दौलतः**--मी....मी....मी....तें....

**मानाजीः**—असा चांचरतोस काय ? नोकरीवरून काढून टाकीन एकदम.

**दौलतः**--(घाबरून) चु....चु....चुकलो सरकार. दया करावी माझ्यावर !

**मानाजीः**—पुन्हां असं करूं नकोस. कायरे, काय दाद आहे तुझी ? चल पटकन् बोल, इथं थांबायला मला वेळ नाहीं.

**सुभानः**—चोरांनीं माझ्या घरावर दरोडा घातला. माझं घर लुटलं.

**मानाजी**:--कुठं ? माझ्या हद्दीत ? झूट, अगदीं झूट.

**सुभान**:--खरंच सरकार, मी खोटं कशापाई बोलूं ?

**मानाजी**:—कायरे, चोर तुझ्या ओळखीचे आहेत का ?

**सुभान**:--सरकार, गरिबाची थट्टा करतां ? चोर ओळखीचे कसे असणार ?

**मानाजी**:—( स्वगत ) ठरल्याप्रमाणं माझ्या लोकांनीं कालचं काम पार पाडलं तर ? ( उघड ) ए हरामखोरा, खोटं बोलून माझ्या इभ्रतीला कमीपणा आणतोस ?

**सुभान**:—नाहीं सरकार, खरोखरच चोरांनीं माझं घर लुटलं आहे, अजून पुरावासुद्धां जसाच्या तसा शाबूत आहे

**मानाजी**:—खोटं. अगदीं सपशेल खोटं. चल चालता हो इथून. अशी खोटी फिर्याद घेऊन पुन्हां येऊं नकोस. जा चोर घेऊन ये.

**सुभान**:—सरकार, या गरीबाचा इन्साफ असाच करतां का ?

**मानाजी**:—मी सांगितला हाच इन्साफ. चल जातोस कीं नाहीं ? नाहींपेक्षां तूं खोटी फिर्याद घेऊन आलास म्हणून तुलाच तुरुंगांत डांबून ठेवीन. दौलत, हकाल देव याला.

**दौलत**:—आतां कसा जात नाहीं तें पहातों. (सुभानरावाला ओढूं लागतो)

**सुभान**:—मी चोर ? मी लबाड ? सरकार, लक्षांत ठेवा-माझ्यासारख्या गरिबाचे तळतळाट आपल्याला बाधल्याशिवाय रहाणार नाहींत.

**मानाजी**:—बरं बरं बाधूं देत. या असल्या लोकांचीं तोंडं चांगला मार देऊन बंद केलीं पाहिजेत. त्याखेरीज हे नीट ताळ्यावर यायचे नाहींत. ( दौलत सुभानरावला हांकलून देतो. ) दौलत, गेला का तो सैतान ?

**दौलत**:--रडत चालला आहे सरकार !

**मानाजी**:--सरकार रडत चालला आहे का रे ?

**दौलत**:—भलतंच, तो माणूस रडत चालला आहे.

**मानाजी**:--पण तुला सांगितलेल्या कामाचं काय केलंस ? कां विसरलास?

**दौलत**:—छे...छे...छे....मुद्याची गोष्ट कशी विसरेन ! हा-या गडबडींत सांगायचं राहूनच गेलं. आतांच जयंती देवळाकडे गेली आहे.

**मानाजी**:—देवळाकडेच कशावरून ?

**दौलत**:—हातांत पूजेचं साहित्य होतं—शिवाय आज शुक्रवार; आई भवानीचा वार ना ? हां—अजून पोंचलीसुद्धां नसेल.

**मानाजी**:—दौलत, खरं सांगतोस तूं हें ?

**दौलत**:—आपल्याजवळ कधीं खोटं बोलेन मी ! सरकार, आपली ही कामागिरी पार पाडली—म्हणून माझं बक्षीस-

**मानाजी**:—माझं काम जर मनासारखं झालं, तर तुला चागलं बक्षीस देईन ( जाऊं लागतो. )

**दौलत**:—आणि सरदारीची खटपट पण—

**मानाजी**:—तें पण पाहूं. पण लक्षांत ठेव, जर काही गोष्ट कुणाला सांगितलीस तर या माझ्या तलवारीशीं गांठ आहे ( जातो )

**दौलत**:—आज मानाजीराव काम साधून येणार ! तिकडून ते खूष होऊन आले कीं मला सरदार करणार ! ही सरदारीची बातमी माझ्या बायकोला सांगून तिला अगदीं चकित करून सोडतों मी ! माझा अपमान करते म्हणजे काय ? उद्यां सरदार झाल्यावर कसा अपमान करते तें पहातों ! आजपासून हा दौलत, दौलतराव होणार ! मोठा सरदार बनणार ! ( मोठ्या रुबाबांत चालत असतांना त्याचा हात तलवारीच्या मुठीवर पडतो तावडतोब, चमकून जाऊन तोंड बांकडें करीत ) पण या तलवारीचं कसं जुळणार ? ( जातो )

---

## प्रवेश ४ था.

( स्थळ:—जंगल-रस्ता. )

**सुभान**:—करुणसागरा नारायणा, इतका कसारे निर्दय झालास? धर्माचा नाश करणारा हा अधर्माचा वणवा तुला कसोरे दिसत नाहीं ? कां देवा, लोकांनीं तुला दगडाचा बनवला म्हणून तूं दगडासारखा कठोर बनला आहेस ? गाई ब्राम्हणांचा, अनाथअपंगांचा कंसानं केलेला अमानुष छळ तुला पाहवला नाहीं, म्हणून तूं आठवा अवतार घेऊन त्या पापी कंसाचं

पारिपत्य केलंस, मग आतांच कसारे निर्दय अंतःकरणाचा कठोर बनला आहेस ? परमेश्वरा ! आतां मी काय बरं करूं ? माझ्या या अडल्या वेळेला, मला कोण बरं साह्य करील ? लोकांनीं सांगितल्याप्रमाणं आतां हंबीरराव मोहित्याकडे जाऊन त्यांना तरी आपली कर्मकहाणी सांगूं या. [ जातो ]

---

## प्रवेश ५ वा

( स्थळः—दौलतरावाचें घर. )

[ तलवार, भाला, बरची, तिरकमटा, ढाल, जंबिया, कुऱ्हाड, परशु वगैरे हत्यारें अस्ताव्यस्त पडलीं असून, त्यांच्याकडे निराश नजरेनें पहात, कपाळाला हात लाऊन सुस्कारे सोडीत बसलेला दौलतराव. ]

**दौलतः**—नांव मोठं आणि लक्षण खोटं ! असं जें म्हणतात तें कांहीं खोटं नाहीं. माझं नांव दौलतराव, माझ्या बायकोचं नांव लक्ष्मी, पण घरीं दौलतही नाहीं आणि लक्ष्मी पण नाहीं, पण आमची ही–ही पिढीजात लक्ष्मी आमचे वडील, आजोबा, पणजोबा, खापर पणजोबा, या सर्वांची ही सगळी मालमिळकत, माझ्या एकट्याच्या वांट्याला आली आहे. तलवार, भाला, बरची, पट्टा, तिरकमटा, कट्यार, जंबिया, परशु, कुऱ्हाड, हीं इतकीं हत्यारं मी बाळगून आहे तरी ती मला भित्राभागुबाई म्हणते ! पुजाऱ्याकडून एक वेळ देवाची आरती करणं चुकेल, पण आमच्या हिनं माझी हजेरी घेतली नाहीं असा दिवस कांहीं सुना जात नाहीं. मला म्हणते, शूर व्हा–मर्द बना–वीर बना, पण हिला अगदींच कसं कळत नाहीं, कीं शूर बनून वीर होणं, म्हणजे चुलीवरून भाताचं भांड उतरण्याइतकं का सोपं आहे ? आश्चर्याची गोष्ट ही, कीं तिला तलवारीचे हात सफाईदार येतात, आणि तीच मला शिकवूं लागते !

**लक्ष्मीः**—( आंतून मोठ्यानें ) काय चाललं आहे तिकडे ?

**दौलतः**—आं ! आली वाटतं ! दौलतराव करा सुरवात ! केलेल्या कामाची हजेरी घेतल्यावांचून रहाणार नाहीं ही ! ( तलवार घेऊन तोंड वेडेंवांकडें करीत फिरवूं लागतो. हातापायांनां कंप सुटला असून डोळे मिटून घेतले

आहेत, लक्ष्मी प्रवेश करते व हें दृश्य पाहून तिला हसूं येतें व ती पटकन् पुढें येऊन त्याचा हात धरते, हें पाहून दौलतराव जास्तच अवसान आणतो )

**लक्ष्मी:**—हं....हं ...डोळे उघडून हात आवरून धरा. नाहींतर माझा कपाळ मोक्ष कराल ना ?

**दौलत:**—सोड–सोड–माझा हात. माझा हिरमोड करूं नकोस, यावेळीं माझ्या अंगांत वीरश्रीचं अवसान आलं आहे ! सोड–सोड माझा हात.

**लक्ष्मी:**—डोळे उघडल्याशिवाय मी मुळींच हात सोडायची नाहीं.

**दौलत:**—( तलवार टाकून ) झालं. विचार न करतां अवसानघात करून मोकळी झालीस. नवऱ्याच्या कामांत या बायका हरहमेश असा बिघाड घालीत असतात.

**लक्ष्मी:**—आपला हात सांवरून धरला म्हणून बरं झालं. नाहींतर कपाळ फुटलं असतं ना माझं.

**दौलत:**—मग त्यांत वाईट काय झालं असतं ? माझ्या कपाळाचं सुख तुला भोगायचं आहे, कारण बायकोचं दैव नवऱ्याच्या दैवावर अवलंबून असतं हें आहे का तुला ठाऊक ?

**लक्ष्मी:**—सगळं काहीं मला चांगलं ठाऊक आहे ! तर मग चालूं द्या.... हूं....चालू द्या. आपल्या शूरत्वाचा धिंगाणा ! आतां आपल्याला अडवायला कुणी येतच नाहीं. हं....

**दौलत:**—लक्ष्मी, असं काय बरं करतेस ? शूर व्हायला तूंच मला उपदेश करतेस म्हणून ही रंगीत तालीम करून, मर्द होण्याची कोशीस करीत आहे मी !

**लक्ष्मी:**—पण लक्षांत ठेवा हं, चांगले शूर झालांत, तरी तुमच्यासारखे मूळचे भित्रे पुरुष—

**दौलत:**—भित्रे पुरुष ?

**लक्ष्मी:**—हो....हो.. भित्रे पुरुष !

**दौलत:**—अग हळू—जरा हळू तरी बोल. इतक्या मोठ्यानं मला भित्रा म्हणतेस, हें लोकांनीं जर ऐकलं, तर फजिती करतील ना माझी ! हंसतील ना पोट धरधरून ! आधींच लोक मला भित्रा ठरवीत आहेत, त्यांत तुझ्या–

बायकोच्या बोलण्याची भर! मग काय विचारतां? तुझ्यासारख्या कजाग बायकोला जरा सैल सोडली, कीं ती बसलीच नवऱ्याच्या डोकीवर!

**लक्ष्मीः**—कशी?

**दौलतः**—ही अशी! ( स्वगत ) कां? तर आम्हीं भित्रे म्हणून—मला वाटतं भिऱ्या पुरुषांनां त्यांच्या बायका अशाच छळीत असल्या पाहिजेत!

**लक्ष्मीः**—बोला. आतां कां गप्प बसलांत? द्या माझ्या प्रश्नाचं उत्तर!

**दौलतः**—महामाये! एकदां का तूं बोलूं लागलीस, कीं माझी एकदम दांतखिळीच बसते. अग, बायको म्हणजे स्वयंपाकघरांतील राणी! स्वयंपाकघरांतील साम्राज्यांत तिनं वाटेल तशी सत्ता गाजवावी, पण नवऱ्याच्या भानगडींत बिलकूल पडूं नये.

**लक्ष्मीः**—अगबाई, कशास कांहीं नाहीं तो इतका थयथयाट चालला आहे. तरी बरं—भारी भित्रे आहांत. चांगले शूर असतां तर माझ्या बोलण्यानं चिडून जाऊन गुडघाभर पाण्यांत जीव द्यायला तयार झाला असतां!

**दौलतः**—हं....लक्ष्मी, तूं फार शेफारत चालली आहेस. माझ्या भित्रेपणाचा फायदा घेऊन माझा छळ करते आहेस; पण मी तुला बजावून ठेवतो कीं, आज मी भित्रा आहे खरा, पण उद्यां शूर झाल्यावर तुझी माझ्याशीं गांठ आहे, हें ध्यानांत असूं दे.

**लक्ष्मीः**—बाई! बाई! बाई! हें का मला सांगायला हवं? पण खरं बोलायला मी कुणाला देखील भिणार नाहीं.

**दौलतः**—हो—हो—तर. कव्हां भितेस, ती आतां भिणार आहेस?

**लक्ष्मीः**—आतां गप्प बसायला काय घ्याल?

**दौलतः**—दौलतराव, बसा गप्प! या हिच्या तोंडाच्या नगाऱ्यापुढं तुमच्या तोंडाच्या टिमकीचं कांहीं चालणार नाहीं. चला, जाऊं या नोकरीवर. [ जाऊं लागतो. ]

**लक्ष्मीः**—अंहं....या नोकरीवर राहून आपण निराळाच कावा साधून घेणार आहांत हें मला पक्कं माहीत आहे. ही सारी सरदारी करितां.......

**दौलतः**—खटपट! बस, बस! कशी सुरेख बोललीस. तिच्याच संबंधानं

मी तुला सांगणार होतों, पण तूं सुरवातीपासूनच माझा कचरा करून मला बोलूंच देत नाहींस.

**लक्ष्मी:**—हं. ही बसलें गप्प. सांगा पाहूं ?

**दौलत:**—[स्वगत] मघापासून ही माझा सारखा पाणउतारा करते आहे, पण लौकरच मी केवढा मोठा सरदार होणार आहे, हें आतां हिला समजलं, कीं माझी अशी हांजी हांजी करूं लागेल कीं यंवरे यंव (उघड) लक्ष्मी, अशी इकडे ये.अग कुणी ऐकेलना ? नाहीं येत? बरं, मीच येतों तुझ्याकडे. ऐक. मानाजीरावांनीं मला एक नाजुक कामगिरी सांगितली होती. ओळख पाहूं कुठली ती ?

**लक्ष्मी:**—मला नाहीं कांहीं समजत. हूं....करा चालू आपलं बढाईपुराण !

**दौलत:**—अग, ही बढाई नव्हे–बहाद्दरी आहे बहाद्दरी ! ऐक, नभाजीची पोरगी–ती जयंती, तिच्यावर बरेच दिवसांपासून मानाजीरावांची नजर आहे, आणि तिला गांठून द्यायची कामगिरी, त्यांनीं माझ्यावर सोपविली होती. जयंती घटकेपूर्वी देवीच्या देवळाकडे गेली, असं पहातांच मी मानाजीरावांना वर्दी दिली. माझ्यावर ते खूष झाले ! तुला चांगलं बक्षीस देईन, मोठा सरदार करीन, असं सांगून ते देवळाकडे गेले, आणि ही आनंदाची बातमी सांगायला मी इकडे आलों. (आपल्याच रुबाबांत सरदारीच्या झोंकांत चालूं लागतो. नंतर आरशांत पाहून ऐट आणूं लागतो. )

**लक्ष्मी:**—(स्वगत) जयंतीवर मानाजीची नजर ? आणि तिच्या पाठोपाठ त्यांचं देवळांत जाणं ? यावेळीं कुणी देवळांत असलं तर ठीक, नाहींतर बिचाऱ्या जयंतीवर बिकट प्रसंग येणार खास. तिची सुटका करायला मी काय बरं करूं ?

**दौलत:**—लक्ष्मी, आतां मी सरदार होणार आहे आणि तूं सुद्धां सरदारीण बनून मिरवणार आहेस... हां....कां खरं कीं नाहीं ? पण तूं विचार कसला करते आहेस ?

**लक्ष्मी:**—विचार हाच, कीं आपण फार पुढं गेलां आहांत !

**दौलत:**—आं! पुढं? पुढं म्हणजे कुठं? मी तर तुझ्या समोरच उभा आहे ना!

**लक्ष्मी:**—तस नाहीं म्हटलं, दुसऱ्यांच्या आयाबहिणीवर नजर ठेवण्याचं चांगलं–चांगलं काम पत्करलं आहांत ! अगदीं खासा धंदा शोधून काढलात !

**दौलतः**—[ गांगरून जाऊन ] आतां मी—

**लक्ष्मीः**—मानाजीची अशी हरामपणाची कामगिरी करतांना उद्यां मलामुद्धां त्यांच्या हवालीं कराल ?

**दौलतः**—(स्वगत) ही तर–माझ्यावरच उलटली! माझीच कानउघाडणी करूं लागली ! (उघड) तुला कसं हवालीं करीन ? मला वेड लागलंय वाटतं?

**लक्ष्मीः**—सरदारीचं आपल्याला पुरतं वेड लागलं आहे. पण असल्या पापी कृत्यांनीं मिळणारी सरदारी मला नको आहे.

**दौलतः**—मग पाहिजे तरी काय ?

**लक्ष्मीः**—कष्टाची मीठभाकर पोटाला पुरेशी मिळाली म्हणजे झालं. तसं कशाला, मीच सगळ्या गांवांत सांगत सुटतें, कीं आमच्याकडे–मानाजीच्या कृष्णकृत्यांत सामील आहेत, तेव्हां त्यांच्यापासून सावध रहा. पहा चाललें मी.

**दौलतः**—(रागानें भडकून जाऊन दणादण पाय आपटीत ) हं लक्ष्मी, अशी मर्यादा सोडून वहात जाऊं नकोस. माझी कीर्ती तूं साऱ्या गांवांत सांगत सुटणार ? एवढावेळ माझी बायको म्हणून मी गय केली, पण आतां माझा संताप अगदीं आवरेनासा झाला आहे. चांगलं बदडल्याखेरीज ताळ्यावर यायची नाहींस तूं. (तिला मारण्याच्या उद्देशानें काठी, सोटा, तलवार उचलीत आहे, टाकीत आहे व शेवटीं काठी घेऊन तिला मारायला जातो. )

**लक्ष्मीः**—(तोंच लक्ष्मी मोठ्यानें किंकाळी मारते, आणि अंगांत पिशाच्च आल्यासारखें करून नाचूं-घुमूं लागते. ) हूं....हूं....हूं....हूं....हूं...

**दौलतः**—(घाबरून जाऊन काठी टाकून देतो) अरे बापरे ! हें काय लचांड आतां माझी धडगत दिसत नाहीं ! ( तलवार घेऊन मारण्याकरितां जातो.)

**लक्ष्मीः**—(अगदीं खड्या स्वरांत आणि पुरुषी आवाजांत ) हूं.,हूं..हूं.... कोण मला मारायला येत आहे ? खाईन त्याला ! चावीन त्याला ! गिळीन त्याला ( एकदम त्याच्या अंगावर चाल करून जाते. दौलतराव घाबरून जाऊन पळूं लागतो. ती त्याचा पाठलाग करते तो हातांतील तलवार टाकून देऊन ओरडूं लागतो. )

**दौलतः**— धांवारे धांवा. मेलोंरे मेलों. धांवा धांवा.




दौलतराव:—आग्यावेताळ ! अरे बापरे !

**लक्ष्मी:**—चूप. येऊं दे कुणी सोडवायला, फाडून खाईन त्याला! हूं....हूं.

**दौलत:**—अग आई ग-[ कोंबडी वळते ] प....प....पण तूं आहेस तरी को....को....कोण ?

**लक्ष्मी:**—आग्या वेताळ !

**दौलत:**—आग्या-वेताळ ! अरे बापरे ! रा....रा....राम...राम...राम. वेताळा, माझ्या घरांतून जा बाबा !

**लक्ष्मी:**—हूं...हूं...हूं....माझ्या भक्ताला आज तूं फार त्रास दिला आहेस, तेव्हां अगोदर तुझा बळी घेईन आणि मग जाईन.

**दौलत:**—अग आई ग ! राम....राम...म....म....म....मरा....मरा. वेताळा, माझ्या बायकोला धर-मार-काप-काय वाटेल तें कर, पण मला सोडरे बाबा. राम-राम-राम-तुझ्या पायां पडतो, पदर पसरतों, पाहिजे तर नाक सुद्धां घांसतों, पण तू जा एकदांचा [ साष्टांग नमस्कार घालतो. ]

**लक्ष्मी:**—[ स्वगत ] भित्रेपणाचं सोंग कसं पटकन बाहेर पडलं. उसनं अवसान कितीवेळ टिकणार ? ( उघड ) हूं....हूं....हूं. या हात जोडण्याचा, पायां पडण्याचा आणि नाक घांसण्याचा कांहींही उपयोग व्हायचा नाहीं.

**दौलत:**—( एकदम उलट फिरून बसतो आणि मोठ्यानें ओरडत ) अग आई ग. मेलोंरे-मेलों ! वेताळा, तुला कोंबडी देतों, बोकड देतों, दारू देतों.

**लक्ष्मी:**—मी तुझ्या कोंबडी बोकडाला भुकेलेला नाहीं. माझी भूक त्याहून मोठी आहे ! हूं....हूं....

**दौलत:**—अरे देवा ! कसली तुझी भूक ! सांग बाबा लवकर आणि जा कसा पटकन !

**लक्ष्मी:**—जाईन, पण माझ्या कांहीं अटी आहेत ! हूं....हूं....हूं....

**दौलत:**—तुझ्या शंभर अटीसुद्धां मी कबूल करतों. राम....राम....

**लक्ष्मी:**—एक, माझ्या या भक्ताला कधींही त्रास देतां कामा नये तूं ! हूं....हूं...

**दौलत:**—नाहीं, नाहीं, नाहीं. यापुढं मी कधींही त्रास देणार नाहीं.

**लक्ष्मी:**—यापुढं माझ्या भक्ताच्या सांगण्याप्रमाणं चालशील कीं नाहीं? हूं....हूं....

**दौलत:**—चालेन, चालेन, राम....राम...राम. भक्‌ मारतं रामनाम! देवा, मारुतीराया, शंकरा, नारायणा, दत्तराजा, मल्हारी, खंडोबा, जगदंबे, म्हाळसे, चाणकाई, चोणकाई, अंबाबाई-- तुम्हींच माझं रक्षण करारे करा!

**लक्ष्मी:**—येऊं द्या तर तुमच्या त्या देवांना? पहातों मी त्यांना हूं....हूं.

**दौलत:**—मसणांत गेले सारे देव! माझा देव तूंच. तूंच मला तारेरे बाबा!

**लक्ष्मी:**—मघाशीं मी शूर—मी वीर—अशी बढाई मारलीस कीं नाहीं!

**दौलत:**—मारली, भक्‌ मारली. त्याच्याकरितां ही पहा थोबाडींत मारून घेतों.

**लक्ष्मी:**—या पुढं मानाजीच्या सांगण्यावरून बायकांवर नजर ठेवण्याचं काम करतां कामा नये तूं!

**दौलत:**—नाहीं, नाहीं करणार मी.

**लक्ष्मी:**—माझ्या येण्याची खबर तूं कुणाला दिलीस तर मेलासच म्हणून समज.

**दौलत:**—माझा प्राण गेला तरी ही गोष्ट कुठं बोलणार नाहीं.

**लक्ष्मी:**—पुन्हां. पुन्हां बजावून सांगतों आहे. कधीं चुकलास कीं चटकन येऊन तुझ्या नरडीचा घोट घेईन.

**दौलत:**—नको, नको. मी तसं करणारच नाहीं.

**लक्ष्मी:**—आतां माझ्या भक्ताला सावध करून, लगेच–अगदीं वेळ न गमावतां–कामावर चालता हो. एक क्षणभरसुद्धां थांबूं नकोस इथं. काय समजलास?

**दौलत:**—कबूल, कबूल. मी लगेच जातों.

**लक्ष्मी:**—जाऊं मी?

**दौलत:**—जा बाबा, जा. राम....राम....राम....

(लक्ष्मी डोळे मिटून घेऊन निश्चल उभी रहाते व अंगांतून वारें निघून जात असल्याची बतावणी करते. दौलत तिच्या हालचाली घाबरटपणानें पहात रहातो, नंतर लक्ष्मी आस्ते आस्ते सावध होऊं लागते.)

**लक्ष्मी**:--मी कुठं आहे ?

**दौलत**:--लक्ष्मी ? भूत खरंच गेलं कीं काय ?

**लक्ष्मी**:--भूत ! कसलं बाई भूत ( त्याच्याजवळ जाऊं लागते व तो मागें मागें सरकूं लागतो. )

**दौलत**:—हं... हं....हं... दूर....दूर उभी रहा. राम राम म्हण अगोदर !

**लक्ष्मी**:--काय तरी बाई थट्टा ! राम....राम....राम....

**दौलत**:—आतां मात्र खरंच भूत गेलं ! जीवांत जीव आला माझ्या !

**लक्ष्मी**:—असं भूतासारखं काय करायला लागला आहांत ?

**दौलत**:—अग तुझ्या अंगांत आतां आग्या-वेताळ आला होता ना ?

**लक्ष्मी**:—आग्या-वेताळ ! माझ्या अंगांत ? भलतंच !

**दौलत**:—थट्टा करूं नकोस अशी ! त्या आग्या-वेताळनं काय काय केलंन.

**लक्ष्मी**:—खरंच, काय काय केलंन हो त्यानं ?

**दौलत**:—त्यानं असं केलंन कीं-पण नको-(पटकन तोंड दाबून धरतो.) हं—हं—कुणालाही कांहीं एक सांगायचं नाहीं, अशी सक्त ताकीद दिली आहे त्यानं. आणि त्याच्या ताकिदीप्रमाणं मला आतां कामावर गेलंच पाहिजे.

**लक्ष्मी**:—समजा, नाहीं गेलं तर ?

**दौलत**:—पुन्हां येऊन मानगुटीवर बसेन असं बजावून गेला आहे ना तो आग्या वेताळ ! तर जातोंच मी.

**लक्ष्मी**:--जरा थोडं खाऊन जावं.

**दौलत**:--छे-छे-छे नको, नको तें खाणं. नाहींतर आग्या-वेताळ ! अरे बापरे [ गडबडीनें धांवत जातो, ]

**लक्ष्मी**:—देवा, मी माझ्या पतीला छळलं, फसवलं, नाहीं नाहीं तें टाकून बोललें, याची मला क्षमा करा. आम्हां बायकांच्या हातीं असलेल्या उपायांपैकीं नवऱ्याला ताळ्यावर आणायचा हा एक उपाय आहे. जयंती ! जयंतीची सुटका करायला मी काय बरं करूं ? कुणाला सांगूं ? कुणाला विनंती करूं ? मानाजीसारख्या काळापासून तिला सोडविण्याचं धाडस कोण बरं करील ? हंबीरराव सोडवितील का ? हो, जर कुणी समर्थ अस-

तील तर ते हंबीररावच. मग जावंच त्यांच्याकडं–पण माझ्या पतीची ही निंद्य करणी मी त्यांना कोणत्या तोंडानं सांगू ? लाज आणि विचार यांचा झगडा या हृदयांत चालला आहे. पतीला पापकृत्यापासून परावृत्त करायला, पत्नीनं सर्वस्वी आपल्या सुखावर पाणी नको कां सोडायला ?

**पद**

**दान द्यावें तें जिवाचें ॥ पाप पतीचें लोपवाया ॥**
**योग्य धर्म हा सतीला ॥ स्वकुल शीला शोभवाया ॥धृ०॥**
**दैव अबलेचें विधाता ॥ नाथ दैवा जोडुनीयां ॥**
**सौख्य दुःखीं खेळवीतो ॥ भाव–सूत्रें चालवाया ॥ १ ॥**

( जात )

---

## प्रवेश ६ वा

( **स्थळ**:—हंबीरराव मोहित्यांचा वाडा. )

[ आईबापांच्या तसबिरींना हार घातले असून, त्यांना वंदन करीत असलेले हंबीरराव मोहिते ]

**हंबीरः**––मातृपितृ देवतानों, आपल्या या लाडक्या हंबीराला ध्येयापासून पराङ्मुख न होण्याचा आशिर्वाद द्या. आई, स्वदेश प्रेमाचं बाळकडू तूंच मला पाजलंसना ? तुझ्याच शिकवणीमुळं माझं मन स्वदेशमय झालं आहे. जोपर्यंत मातेचं ऋण पुत्र फेडीत नाहीं, तोंपर्यंत तो मातृऋणातून मुक्त होत नाहीं. बाबा, आपली ही अचल दृष्टी अशीच माझ्याकडे लावा. आपल्या तसबिरींतल्या चेहऱ्यावर देखील धीरोदात्त हास्य खेळत असलेलं दिसत आहे याच हास्यमुद्रेनं मला आत्मविश्वास येणार आहे. शिवाजीमहाराजांच्या स्वराज्य स्थापनेकरितां आपल्याला भाग्याचं मरण येऊन, आपण पुण्यलोकीं गेलां आहां. त्या तुमच्यासारख्या वीर पुरुषाचा मी पुत्र असून, या मानाजीच्या त्रासानं कर्तव्य पराङ्मुख होऊं ! मरणघडीं माझा हात महाराजांच्या हातांत मोठ्या विश्वासानं दिलांत, त्यांचा विश्वासघात करूं ?

आपल्या लोकांवर मी शस्त्र उचलणार नाहीं, असं महाराजांना मी वचन दिलं आहे, त्याचाहि भंग करूं ? पण माझा राग अनावर होतो, कारण दिवसेंदिवस हा मानाजी उन्मत्त बनत चालला आहे. या मानाजीबरोबर सामना देणं, म्हणजे महाराजांची आज्ञा भंग करणं आहे. नाहींतर या तलवारीच्या जोरावर अनेकांचं रक्षण—

[ सुभानराव धांवत येऊन पाय पकडतो. ]

**सुभानः**—रक्षण करा, महाराज माझं रक्षण करा.

**हंबीरः**—रक्षण करा ? कुणापासून तुझं रक्षण करूं ? कोण तूं ?

**सुभानः**—महाराज, माझं घर चोरांनीं लुटलं, म्हणून मान्यांकडे दाद मागायला गेलों, पण त्यांनीं कांहीं एक ऐकून न घेतां, मला मार देऊन हांकलून दिलं. त्यांच्या नोकरानं लाथाबुक्यांनीं मारलं कीं हो मला !

**हंबीरः**—दुःखी जीवा, शांत हो. तुझं तळमळणारं अंतःकरण पाहून माझं हृदय संतापानं भडकूं लागलं आहे. तुझ्यावर झालेल्या अन्यायाबद्दल मी मानाजीला चांगली अद्दल घडविली असती, पण महाराजांच्या आज्ञे-वांचून मला त्याचं पारिपत्य करतां येत नाहीं. महाराज-महाराज, कोणत्या अशुभ वेळेवर माझ्याकडून वचन मागून घेतलंत, आणि त्यामुळं मानाजीनं चालविलेले अत्याचार मला निमूटपणं पहावे लागत आहेत !

**सुभानः**—महाराज, मोठ्या आशेनं आपल्या पायांकडे धांव घेतली आहे. माझे एकट्याचे हाल सोसायला मी तयार आहे, पण मानाजीच्या करणीमुळं दिवसेंदिवस आग लागत चालली आहे. येऊं नयेत ते प्रसंग येत आहेत !

**हंबीरः**—महाराष्ट्राचं पाप अजून संपलं नाहीं, म्हणून त्याचे असे हाल चालले आहेत. नाहींतर महाराज तुरुंगांत अडकून कां पडावेत–आणि त्यांनीं नेमलेले कांहीं अधिकारी, जुलमी बेजबाबदार बनून, त्यांनीं बेबंदशाही कां माजवावी ? महाराष्ट्राचं दुर्दैव संपतांच महाराज खात्रीनं सुटतील. मग सर्वत्र न्यायाचं, प्रेमाचं, आनंदाचं साम्राज्य झालेलं दिसून येईल. ह्या घे मोहरा. मानाजीचा बंदोबस्त कसा काय करावयाचा याचा मी विचार करून पाहीन.

**सुभानः**—( मोहोरांची थैली घेत आनंदानं, देव आपलं कल्याण करो ! [ जातो. ]

**हंबीरः**--अधिकाऱ्यांच्या अन्यायांबद्दल, त्यांच्या बेजबाबदार कृत्यांबद्दल राजा जबाबदार असतो. न्याय नीतीनं राज्य करण्यांत राजाला भूषण असतं

**पद.**

**यश गौरवी शोभा ॥ नृपती जरी, खल मर्दुनी,**
**साधित जनता लाभा ॥ धृ० ॥**
**राज्यशासनीं न्यायी पटुता ॥ सन्मान तया वसुधातलिं ॥**
**साधित जनता लाभा ॥ १ ॥**

महाराज, आपल्या चारित्र्याला हे मानाजीसारखे लोक कलंक लावीत आहेत. त्यांनीं देशाचं रक्षण करण्याऐवजीं ---

( लक्ष्मी गडबडीनें प्रवेश करून )

**लक्ष्मीः**--रक्षण करा, महाराज रक्षण करा.

**हंबीरः**—रक्षण कुणाचं ? कुणापासून करायचं ? बाई, आपण कोण ?

**लक्ष्मीः**--मी-मी दौलतराव जगतापाची बायको. महाराज, एका कुमारिकेचं रक्षण आपल्याला करायचं आहे.

**हंबीरः**--कुणापासून ?

**लक्ष्मीः**—मानाजीराव मान्यापासून. नभाजीच्या मुलीचं-जयंतीचं.

**हंबीरः**--मानाजी, तुझी पापी नजर अखेर जयंतीवर फिरली अं ! बाई कुठं आहे ती ? कुठल्या प्रसंगांत सांपडली आहे ?

**लक्ष्मीः**—गांवाबाहेरील देवीच्या देवळांत पूजेकरितां गेली आहे ती. महाराज, सांगू नये तें सांगणं. माझ्या नशीबीं आलं आहे, याची क्षमा करा. माझ्या— नवऱ्यानं तिच्या हालचालीवर पाळत ठेवून तिच्या जाण्याची वर्दी मानाजीरावांना दिली. मानाजी वाईट वासनेनं देवळाकडे गेला आहे, हे माझ्या भोळ्या नवऱ्यानं मला सांगितल्यापासून मला चैन पडेना. मोठ्या युक्तीनं मी त्यांना घराबाहेर घालवून दिलं, आणि ही बातमी आपल्याला सांगायला मी धांवत आलें.

**हंबीरः**--धन्य आहे तुमची. कपटी मानाजीचा कावा काळाच असणार. बाई, तुम्ही खोटं तर सांगत नाहीं ना ?

**लक्ष्मीः**--नाहीं महाराज. अक्षर न अक्षर सत्य आहे. तिकडून ही बातमी समजतांच मला धीर धरवेना, म्हणून अशीच धांवत आलें मी. महाराज, प्रत्येक क्षण काळजीचा जात आहे.

**हंबीरः**--वचन ! यावेळीं वचन ! वचनाचा भंग जर यावेळीं केला नाहीं, तर हातीं तरवार असून मी नामर्द ठरेन. बायकांपोरांचा अमानुष छळ चाललेला पाहून प्रतिकार करायला ज्याचं रक्त संतापानं उसळ्या घेत नाहीं तो मुळीं नामर्दच म्हटला पाहिजे.

**लक्ष्मीः**--महाराज, प्रसंग खुनी कपटी काळपुरुषाशीं आहे.

**हंबीरः**--प्रत्यक्ष काळ जरी असला, तरी यावेळीं मी त्याची पर्वा करणार नाहीं. सज्जनांचा छळ दूर करण्यासाठीं, अनाथ अबलांच्या लज्जारक्षणासाठीं, आणि गोरगरिबांच्या कल्याणासाठीं, तो अनाथांचा नाथ, दीनदुबळ्यांचा कैवारी परमेश्वर, हमेशा पाठिराखा होत असतो. बाई, निर्धास्त चित्तानं घरीं चला. जयंतीची सुटका झालीच म्हणून समजा. ( जातो. )

**लक्ष्मीः**--धन्य या पुरुषाची ! बातमी ऐकतांच आश्वासन देऊन निघून गेला. आतां माझी काळजी दूर झाली. पण मी हें काय केलं ? माझ्या पतीची निंद्य करणी मीच बाहेर फोडली. मीच माझ्या अब्रूचे धिंडवडे काढले. पण असं जर न करूं, तर काय बरं करूं ? पतीचं कृत्य जर पापी असेल, तर त्याच्या स्त्रीनं त्याचं निवारण करायला नको का ? पत्नीनं जर हें कर्तव्य केलं नाहीं, तर ती दोषी ठरेल, आणि हा संसार--

**पद.**

**कटुमय संसार हा भासतो ॥**
**बहु आपदा छळिती सदा ॥ धृ० ॥**
**प्रतिदिनीं छळी ही चिंता अपार ॥**
**रंजित मन करणार ॥**
**शांति ॥ विश्रांति ॥ नच मिळती ॥ १ ॥**

( जाते. )

---

## प्रवेश ७ वा

**स्थळः—देवीचें देऊळ.**

( जयंती देवीची पूजा करीत असून, तिचा छोटा भाऊ प्रताप केव्हां एकदां तेथून जायला मिळेल म्हणून अधीर झाला आहे. )

**प्रतापः**—ताई, झाली काग तुझी पूजा ?

**जयंतीः**—झालीच आहे. एवढा प्रसाद दाखविला—

**प्रतापः**—किती वेळ थांबायचं इथं ? कंटाळा आला अगदीं.

**जयंतीः**—उगीच अशी घाई करूं नकोस. प्रसाद घेऊन जा.

**प्रतापः**—ऊं हूं. मला नको तो.

**जयंतीः**—देवाच्या प्रसादाचा असा अनादर करूं नये बाळ. भक्तानं जर भक्तिभावानं प्रसादाचा स्वीकार केला, तर परमेश्वर प्रसन्न होत असतो.

**प्रतापः**—तूं इतके दिवस या देवीची भक्ति करतेस, चांगली पूजाअर्चा करतेस पण ही देवी तुझ्यावर प्रसन्न होत नाहीं. भक्तांच्या इच्छा जर देव पुरवीत नाहींत, तर हे देव कसले ?

### पद

**भजुनी देवा ॥ करुनी सेवा ॥ कसला लाभ नाहीं ॥**
**उगीच गाती ॥ कीर्ती मोठी ॥ भजुनी० ॥ धृ० ॥**
**वंदुनी किती जन पुजिती ॥ बोलती प्रभु सदय अती ॥**
**परि न देतां ॥ चित्त शांति ॥ कवणा सौख्य कांहीं ॥ १ ॥**

**जयंतीः**—असं म्हणूं नये बाळ. देवाच्या कसोटीला उतरल्याखेरीज तो भक्तांवर कधींच दया दाखवीत नसतो.

**प्रतापः**—बरं-राहिलं माझं बोलणं.

**जयंतीः**—शाबास बाळ! (प्रसाद दाखवून त्यांतला थोडा प्रसाद त्याला देते)

**प्रतापः**—[ प्रसाद खात असतां ] आतां झालं ना तुझ्या मनासारखं ? जाऊं मी ? का अजूनही नको ?

**जयंतीः**—( हंसत ) जा बरं. पण संभाळून खेळ हं !

**प्रताप**:--त्याची नको फिकिर तुला. ( जातो )

**जयंती**:—हा जरा जवळ नसला, तर चुकल्यासारखं होतं मला. लहानपणीं मुलांना अखंड दुनियेला आईच्या आधारावर नाचवतां येतं. आई-आई आम्हां दोघांना मागं ठेऊन तूं देवाघरीं लौकर गेलीस ! तिथं तूं मोठ्या आनंदांत असशील, पण इथं मात्र तुझं हरघडी स्मरण होऊन आम्हीं दुःखीं होत आहोंत. आई, तुझं स्मरण झालं, कीं तुझी रूपरेखा या मातेच्या मूर्तीमध्यें मला दिसूं लागते. आई जगदंबे, आतां तूंच माझी आई ! आणि आई, आपल्या आईजवळ मोकळ्या मनानं बोलायला मुलगी कधींतरी लाजते काय?

**पद.**

**स्मित हांसुनी ॥ परि लाजुनी ॥**
**प्रणयी बाला ॥ वदे मंजु बोला ॥ धृ० ॥**
**पती प्रेमळीला ॥ स्मरूनी सुखाला ॥**
**रंगुनी मनीं दंग ॥ विसरे जगाला ॥ १ ॥**

लहानपणीं ही मोहित्यांची बाई बरं, असं बाबांनीं मला नेहमीं चिडवावं, आणि तूं पण त्याचं कौतुक करावंस. खेळांतसुद्धां हंबीरराव माझे पती व्हायचे त्यावेळीं मी त्यांना किती प्रेमानं, पण चोरून हांक मारीत असे !--हंबीरराव (लाजते.) आई, मी लाजलें म्हणून तूं हंसतेस होय ? खुशाल हंस. आतां मी लाजायचीच नाहीं ! चांगली मोठ्यानं हांक मारते. नाथ—

[ मानाजीराव माने प्रवेश करतात. ]

**मानाजी**:--हा पहा तुझा नाथ--तुझ्या हांकेसरसा धांवून आला आहे.

[ दरवाजाला अडसर लावूं लागतो. ]

**जयंती**:--कोण मानाजीराव ? इथं कसे आपण ? आणि असलं बोलणं शोभतं का ? काढा तो अडसर ? ( दरवाजाकडे जाऊं लागते, मानाजी तिला थांबवून धरतो. )

**मानाजी**:--थांब. बोलणं शोभत नसेल, तर तें शोभविणं तुझ्या हातीं आहे ! या मानाजीला आपल्या नाथाच्या पदवीला पावन करून घे. बोल, या देवीचा कौलसुद्धां तुझ्या होकारापुढं मी तुच्छ समजतों.

**जयंती:**—असले शब्द उच्चारायला तुम्हांला लाज कशी वाटत नाहीं?

**मानाजी:**—लाज! सुंदरी, या तुझ्या मनमोहक सौंदर्यानं मला पुरेपुर निर्लज्ज केलं आहे. आणि प्रेमाच्या प्रसंगांत लाजेचा प्रश्न तरी कुठं शिल्लक रहातो?

**जयंती:**—बाह्यांगावर भूलून मोहांत पडलेला प्राणी अखेर पस्ताव्यांत पडत असतो. मानाजीराव, ज्याअर्थी तुमच्या तोंडून असले निर्लज्ज बोल बाहेर पडत आहेत, त्याअर्थी काळ्या करणीनं कठोर बनलेल्या तुमच्या हृदयांत प्रत्यक्ष सैतान संचार करीत असला पाहिजे..

**मानाजी:**—सैतान असो अगर माणूस असो! मला फक्त माझं कार्य साधायचं आहे. या तुझ्या कटु बोलांनीं माझं मन बदलून जाईल, असा का तुझा समज आहे? वेडीरे वेडी! जयंती, खरोखरच, तुझ्यावर माझं मनापासून प्रेम आहे.

**जयंती:**—पापी मनुष्य स्वार्थाकरितां वाटेल ती बडबड करीत असतो. प्रेम म्हणजे कांहीं साधी गोष्ट नाहीं.

**मानाजी:**—आणि म्हणूनच तें सहज प्राप्त होत नाहीं.

**जयंती:**—प्रेमाला उभयपक्षीं खुषी असावी लागते.

**मानाजी:**—जिथं खुषी नसेल, तिथं ती जुलमानं पैदा करावी लागते.

**जयंती:**—पण, मी आपला अपराध तरी कोणता केला?

**मानाजी:**—आपल्या मोहक सौंदर्यानं माझं मन चोरून घेतलंस, हा का थोडा अपराध?

**जयंती:**—अरेरे! स्त्रियांचं सौंदर्य त्यांच्यावर संकट आणतं म्हणायचं! देवा, ही लावण्याची अमोलिक ठेव, आम्हांसारख्या नाजुक स्त्रियांच्या हवालीं कशासाठीं बरं केलीस?

**मानाजी:**—आम्हांसारख्या विलासी पुरुषांसाठीं?

**जयंती:**—किती विचित्र कल्पना ही! मानाजीराव, स्त्री जात या जगांत अत्यंत जबाबदारीचं कार्य करण्याकरितां परमेश्वरानं पैदा केली आहे. तुम्हांला जन्म देऊन मातृप्रेमाची साक्ष पटवून देणारी माता—स्त्री आहे. एकाच पोटीं

जन्म घेऊन, भगिनी प्रेमाची माया पटवून देणारी भगिनी–स्त्री आहे. संसारांत पत्नी पदाची जबाबदारी घेऊन, प्रेम आणि कर्तव्य यांची भावनायुक्त ओळख करून देणारी पत्नी–स्त्री आहे. आणि तुमच्या पोटीं जन्म घेऊन, पितृप्रेमाची वात्सल्यता उत्पन्न करणारी कन्या–स्त्री आहे.

**मानाजी**:—असल्या तर्कटाचं पुराण मला नको ऐकायला. मला तुझा हाकार पाहिजे आहे.

**जयंती**:—आपण जबाबदार माणूस–शिवाजी राजाचे अधिकारी तेव्हां आपल्याला असं करणं शोभतं का? सद्य:स्थितीचा, पापपुण्याचा कांहीं विचार करा आणि महाराष्ट्रात कसली आग भडकत चालली आहे, हें डोळे उघडून नीट पहा.

**मानाजी**:—माझ्या डोळ्यांना तुझ्याशिवाय कांहींच दिसत नाहीं! आणि हें राजकारण आहे, यांत तुझ्यासारख्या रंगेल पोरीनं मन घालूं नये. तूं माझ्या प्रश्नाला उत्तर दिलंस, तर तुझ्या बापाकडे मागणी घालून आपण लग्न जमवून टाकूं!

**जयंती**:—अविचारी प्राण्या, लग्न म्हणजे बाजारचा सौदा नाहीं, कीं तो सहज विकत घेतां येईल? निर्व्याज प्रेमाची लग्नगांठ शुद्ध प्रेमाशिवाय बांधली जात नसते. अमोलिक आयुष्य, अत्यंत पवित्रतेनं आणि निर्मल प्रेमानं एकमेकांच्या सहवासांत जावं, म्हणून विवाह हा मंगल संस्कार मानला आहे.

**मानाजी**:—माणसानं साधक वस्तूंचा संधिकाल वायां दवडून–पापपुण्यानं विचारग्रस्त होणं, नादानपणाचं आहे. जयंती, माझं म्हणणं ऐकशील, तर सर्व सुखं तुला मिळतील! आणि हा मानाजीराव मानं तुझा दास होऊन राहील.

**जयंती**:—नका–मानाजीराव, माझा अभिलाष धरूं नका. मी मनानं दुसऱ्याची झालें आहे.

**मानाजी**:—पण, अद्याप तुझं लग्न कुठं झालं आहे!

**जयंती**:—बाह्यविधी तेवढे व्हायचे बाकी आहेत. तेव्हां परस्त्रीचा अभिलाष धरणं बरं नाहीं. सीतादेवीच्या अभिलाषानं, रावणासारख्या बलाढ्य

राजालासुद्धां चौदाचौकड्यांच्या राज्यासह प्राणाला मुकावं लागलं. गौतम-पत्नी अहिल्येचं पातिव्रत्य भंग करणाऱ्या इंद्राला सहस्र भगं पडलीं.

**मानाजी**:—पण, तोच इंद्र पुढं हजारनेत्री बनला ! जयंती, बोलण्यांत वेळ दवडून तूं जबाब देण्याचं टाळीत आहेस, पण आतां मी तुझ्याकडून जबाब घेतल्याखेरीज तुला सोडणार नाहीं.

**जयंती**:—मानाजीराव, हात जोडून सांगतें—जाऊं द्या मला. माझ्या-सारख्या कुमारिकेला असं एकांती रहाणं—

**मानाजी**:—मग काय ? तुला अशीच सोडून देऊं ? मुकाट्यानं माझ्या मागणीला रुकार दिलास तर ठीक आहे; नाहींपेक्षां तुला स्पर्श करून, तुझा सारा नक्षा उतरून टाकीन.

**जयंती**:—तुमची ही इच्छा कधींहि पुरी होणं शक्य नाहीं. तुमच्यासारख्या नरपशूंपासून, आमचं रक्षण करणारा, आम्हां अबलाचा पाठीराखा प्रत्यक्ष परमेश्वर असतो. पतिव्रतांचा पेंच परमेश्वराला पडत असतो, आणि तोच आमचं रक्षण करीत असतो.

**मानाजी**:—असल्या रंगेल प्रकरणांत पडायला परमेश्वराला काय अधिकार आहे ? आणि माझ्यापुढं परमेश्वर काय पदार्थ आहे ? जयंती, यावेळीं मीच तुझा परमेश्वर आहे.

**जयंती**:—वैभवाच्या औटघटकेच्या दिमाखानं, डौलाच्या डोलाऱ्यावर चढलेल्या मानवी राक्षसा, आजची ही उन्मादावस्था, ही बेमुर्वत बढाई—ईश्वरी कालचक्रानुसार उलटी फिरल्यावांचून रहाणार नाहीं, आणि मानाजीराव आजपर्यंत केलेल्या पापांत आणखी भर कां टाकतां ?

**मानाजी**:—पापाचा मार्ग ? कोण म्हणतो हा पापाचा मार्ग ? जयंती तुझं मन ताळयावर नाहीं खास ! तुझ्यासारख्या सुंदर तरुणीचं आलिंगन घेणं, हें जर पाप ठरतं तर पुण्य तरी कुठलं ? सोळा हजार एकशें आठ स्त्रियांचा उपभोग घेणारा श्रीकृष्ण जर बालब्रह्मचारी आणि देव ठरतो, तर मी पापी कसा ? असले हे धडे खुद्द देवांनींच घालून दिले आहेत.

**जयंती**:—त्या श्रीकृष्ण परमात्म्याची बरोबरी तूं क्षुद्र कीटकानं करावी !

काजव्यानं सूर्याला दिपविण्याचा प्रयत्न करावा! ज्या यदुकुलनंदनानं आपल्या दैवी शक्तीचं सामर्थ्य, कालियासारख्या विषारी नागाच्या फणीवर सहज लीलेनं नृत्य करून दाखविलं, बारा योजनं अग्नी भक्षण करून, ज्यानं नंदराजाची संकटांतून मुक्तता केली; इवल्याशा करांगुलीवर गोवर्धनासारखा प्रचंड पर्वत सांवरून धरून, साऱ्या दुनियेला आपल्या दैवी शक्तीचा दरारा दाखविला; त्याची बरोबरी कुणाला कधीं तरी करतां येईल का?

**मानाजीः**—हो. हो. मी करतोंच आहे; तो जसा गोकुळचा कृष्ण होता, तसा मी या बोरगांवचा कृष्ण आहे! त्याच्यावर जशा गोकुळच्या गोपी फिदा होत्या तशा या बोरगांवांतील बायकांनीं माझ्यावर आषक झालंच पाहिजे. जयंती मघांपासून मी तुझी बरीच मनधरणी करीत आहे, पण अद्याप तूं माझं ऐकत नाहींस; आतां मात्र मला अतिप्रसंग करणं भाग पडेल.

**जयंतीः**—तुमच्या अतिप्रसंगापासून माझं संरक्षण करणारी ही जगदंबा समर्थ आहे.

**मानाजीः**—ही काळ्या फत्तराची मूर्ती मला अटकाव करणार? किती खुळी कल्पना ही! असल्या देवांचं देवपण फक्त दगडांतच असतं. जयंती, याच तुझ्या देवीसमोर तुझ्या तारुण्याचा रंगरस मनमुराद लुटतों आणि मग पहातों तुझ्या या दगडाच्या देवीचं सामर्थ्य किती आहे तें?

**जयंतीः**—अविचारी प्राण्या, परमेश्वरी पराक्रमापुढं तुझ्यासारख्या पापी माणसाचं काय चालणार?

**मानाजीः**—बस्स, तुझी बडबड नको मला ऐकायला. हांक मार तुझ्या साऱ्या देवांना!

**जयंतीः**—अगदीं—अगदीं कसाब आहांत झालं. प्रसंगीं कसाबालासुद्धां गाईची कींव येईल—दगडाला पाझर फुटेल, पण तुमचं हृदय खात्रीनं द्रवणार नाहीं. मानाजीराव, मी अगदीं आत्मविश्वासानं देवाला हांक मारतें आणि—

**मानाजीः**—तो तुझा देव जर इथं प्रगट झाला, तर लाथेच्या एकाच ठोकरीनं त्याला या भिंताडावर भिरकावून देईन—हाताच्या एकाच बुक्कीनं त्याचा

चेंदामेंदा करून टाकीन, नजरेच्या अंगारानं त्याला जिवंत जाळून भस्म करून टाकीन मग पहातों तुझ्या त्या परमेश्वराची काय ताकद आहे ती ?

**जयंती:**--देवा, आतां कां बरं अंत पहातोस ? यावेळीं तूं जर माझ्या अब्रूचं रक्षण केलं नाहींस, तर तुझ्या ब्रीदाला बट्टा लागेल. द्रौपदीमाईची लाज तूं रक्षण केलीस, मग आतां कां बरं अंत पहातोस ? आई, जगदंबे-तूं....

**मानाजी:**—ती या मानाजीची मौज पहात आहे. ( उपरोधीक हंसतो. )

( जयंतीला पकडण्याकरितां पुढें होतो. जयंती त्याला चुकविण्याकरितां प्रयत्न करते. ती देवी भोंवती प्रदक्षिणा घालूं लागते. मानाजी तिचा पाठलाग करूं लागतो. अखेर मानाजी तिचा हात पकडतो. ती सुटका करून घेण्या-करितां धडपड करते. )

**जयंती:**—देवा, देवा—

( मानाजी तिचं चुंबन घेण्याचा प्रयत्न करतो. )

**मानाजी:**—आतां कुठं गेला तुझा तो देव ?

( तोंच देवीची मूर्ती बाजूला सारून-हंबीरराव प्रवेश करतो व जलदीनें आपली तलवार मानाजीच्या छातीवर रोखून धरतो. )

**हंबीर:**—हा पहा तिचं रक्षण करायला इथं प्रगट झाला आहे.

**जयंती:**—( आनंदानें ) कोण हंबीरराव ?

**मानाजी:**—पाजी, बदमाष, हरामखोर.

**हंबीर:**--चूप. एक शब्दसुद्धां जास्त बोलूं नकोस.

**मानाजी:**—हरामखोरा, तूं इथं कशाकरितां आलास ?

**हंबीर:**--या जयंतीला सोडविण्यासाठीं, तुझ्या पापी कृत्यांपासून तुला परावृत्त करण्यासाठीं.

**मानाजी:**—हिला सोडवितांना तुला आपला प्राण बळी द्यावा लागेल.

**हंबीर:**--प्राणाची पर्वा तुझ्यासारख्या पाप्यांना. बढाईखोर, नुसत्या बढाया काय मारतोस ? सोड तिला.

**मानाजी:**—तुझ्या धमकावणीला भिऊन जाऊन, हिला अशीच सोडून देईन असं तुला वाटतं काय ?

**हंबीरः**—मुकाट्यानें हिला सोडलीस तर ठीक आहे, नाहींपेक्षां ही तलवार तुझ्या छातींत घुसलीच म्हणून समज. नीट पहा—माझी तलवार कुठं आहे ती-आणि मग काय तें बोल.

**मानाजीः**—बदमाष. मला तूं कोण समजतोस ?

**हंबीरः**—एक जुलमी दरोडेखोर, बायकांची अब्रू घेणारा हरामखोर.

( मानाजी मध्येंच जलदीनें जयंतीस सोडून देतो व आपण सफाईनें मागें जाऊन तलवार उपसतो. )

**मानाजीः**—बस्स कर तुझी वटवट, चांगल्या जागेंत सांपडला आहेस. अगोदर तुझा इथं मुडदा पाडतों आणि मग हिची व्यवस्था करतों.

( दोघांचें द्वंद्व युद्ध सुरू होतें—डावावर डाव होऊन अखेर मानाजीची तलवार निसटून जाते व तो गांगरून जाऊन स्तब्ध उभा रहातो. हंबीरराव लढण्याचें बंद करून हंसत उभा रहातो. )

**हंबीरः**—कां मानाजी ? उतरला तुझा अभिमान ? तुझ्यासारख्या निःशस्त्र माणसावर शस्त्र चालविण्याइतका मी नादान नाहीं. चल उचल ती तलवार. ताकद असेल तर तुझ्याशीं सामना द्यायला माझी तरवार केव्हांही तयार आहे.

**जयंतीः**—मानाजीराव, अखेर आला ना माझा परमेश्वर ? पाहिलांत ना माझ्या परमेश्वराचा पराक्रम ?

**मानाजीः**—( चडफडत स्वगत ) काय करूं रे ? घेऊं का हिच्या नरडीचा घोट ?

**हंबीरः**—हं मानाजी. चल चालता हो इथून.

**मानाजीः**—( जातांना स्वगत ) ठीक आहे. गांठ माझ्याशीं आहे. याचा सूड न घेईन तर मी नावाचा मानाजीराव मानेच नव्हे. ( जातो. )

**जयंतीः**—महाराज, अगदीं ऐनवेळीं येऊन माझं रक्षण केलंत, याचे उपकार मी कसे बरं फेडूं ?

**हंबीरः**—यांत उपकार कसले ? स्त्रियांचं रक्षण करणं हेंच पुरुषांचं कर्तव्य आहे. जयंती, या आतां घडलेल्या कृत्याविषयीं तूं आपल्या मनाला कांहीं वाटून घेऊं नकोस.

**जयंतीः**—पण महाराज, आपण नेमके हो कसे आलांत इथं ?

**हंबीरः**—तूं पूजेकरितां या देवीच्या देवळांत गेली आहेस, आणि तुझ्या पाठोपाठ मानाजी वाईट वासनेनं गेला आहे-अशी वर्दी मानाजीच्या नोकराच्या बायकोनं मला दिली. मी लगेच निघालों, तो वाटेंत प्रताप भेटला. त्याला विचारतांच तूं देवळांत असल्याचं त्यानं सांगितलं. पुढं देवळाजवळ येतांच दरवाजा आंतून बंद असलेला, मग मात्र माझा संशय बळावला. नंतर मला माहीत असलेल्या या गुप्त वाटेचा उपयोग केला मी !

**जयंती:**—पण आजच्या या अपमानाबद्दल हा चिडलेला मानाजी, कांहींतरी संकट आणल्यावांचून रहाणार नाहीं, असं माझं मन मला सांगत आहे.

**हंबीरः**—या मानाजीच्या बऱ्याच दुष्ट कृत्यांचा प्रतिकार मी करीत आल्यामुळं त्याचा माझ्यावर पूर्वीपासून राग होताच, त्यांत आजच्या प्रसंगानं अधिक भर मात्र पडली. पण भावी संकटांना धैर्यानं तोंड देणं हेंच खरं मानवी कर्तव्य आहे.

**जयंतीः**—महाराज. भावी संकटाचं निवारण करण्याकरितां या आदिमायेच्या चरणीं नमस्कार करून आशिर्वाद मागूं या

**हंबीरः**—देवतांची कृपा असल्यावर काय होणार नाहीं ?

**पद.**

हंबीरः— चिरसुख शांति लाभति मनुजा ॥
जयंतीः— भवभय भ्रांति त्यागिति मनुजा ॥
हंबीरः— मधुमय मंगल जीवन होई ॥
जयंतीः— सौख्य सुधेची सरिता वाही ॥
हंबीर-जयंती— वंदुनी प्रभुच्या पदकमला ॥
निशिदिनीं ध्यानीं धरि विभुला ॥
निश्चल भाव भक्तीनें जरी पुजिला ॥
तोचि जीवनाधारा ॥ १ ॥

( नमस्कार करूं लागतात. पडदा पडतो. )

## अंक पहिला समाप्त.

# अंक २ रा.

## प्रवेश १ ला.

**स्थळ**—मानाजीरावांचा वाडा.

**मानाजी**:—या मानाजीचा अपमान! आणि तोसुद्धां प्रेमाच्या प्रतिस्पर्ध्या-कडून! बस. या अपमानाचा अतिरेक झाला. या अपमानाचा द्वेषाग्नी सारखा पेटतो आहे. त्यांत हंबीरा, तुझी आहुती पडल्यावांचून तो शांत होणार नाहीं. हरामखोरा, नीट लक्षांत ठेव-एकाद्या साध्या भोळ्या मनुष्याशीं प्रसंग नसून या मानाजीशीं आहे. मी माझ्या ओठाशीं नेलेला अमृताचा प्याला तूं बेदरकारपणं उडवून दिला आहेस. अचानक रीतीनें माझी तलवार गळून पडली म्हणून तूं विजयी झालास-आणि ती मानी पोर खदखदां हसूं लागली! जाळ्यांत सांपडलेलं सावज निसटलं आहे तर युक्तीच्या मार्गानं पुन्हां फसवून टाकीन. वेडे जयंती, तुझं लग्न अखेर या मानाजीबरोबरच होणार आहे. कोण आहेरे? दौलत--

**दौलत**:--( गडबडीनें प्रवेश करीत ) जी सरकार.

**मानाजी**:--नभाजीला बोलवायला माणूस गेला कीं नाहीं? असं तोंड काय पहातो आहेस?

**दौलत**:--नाहीं सरकार, माणूस तर केव्हांच गेला आहे! ( स्वगत ) स्वारीचा रंग बिघडलेला दिसतो आहे!

**मानाजी**:—त्या पोरीनं देवळांतली हकीकत जर नभाजीला सांगितली असेल तर? तर तो थेरडा इकडे मुळींच यायचा नाहीं. आणि नाहीं आला तर-त्याला कैद करून आणीन मी. दौलत, ते येताहेत कां तें पहा.

**दौलत**:—होय सरकार. ( स्वगत ) यांच्या या रागावण्यानं माझ्या सरदारी थाटाचा बेरंग होत चालला आहे! [ नभाजीराव येतात तें पाहून दौलत त्वरेनें सामोरा धांवत जातो. ] या....या....या...नभाजीराव.

**मानाजी**:—( उठून सामोरा जात ) यावं, यावं नभाजीराव, बसा बसा दौलत, असा उभा काय राहिलास शुंभासारखा ? जा लौकर साखरपाणी घेऊन ये. बेअक्कल कुठला !

**दौलत**:—होय-होय-सरकार-( धांवत निघून जातो ).

**नभाजी**:—कांहीं नको मानाजीराव, त्याची मुळीं जरूरी नाहीं. आपलं निकडीचं बोलावणं आलं-तेव्हां वाटलं कांहीं महत्वाचं काम असेल ? महाराजांविषयीं कांहीं बातमी ?....कां आणखी कांहीं खबरबात ?

**मानाजी**:--छे. छे. महाराज अद्याप तुरुंगातच आहेत, त्यांच्याकडील कांहीं एक बातमी नाहीं. पण हो, एका खासगी बाबतींत-मला आपला सल्ला घ्यायचा आहे. असं पहा, शिवाजी महाराजांनीं मला जी या बोरगांवची आणि इतर प्रांताची सरदारी दिली आहे, ती माझ्या वंशांत कायम रहावी असा माझा मनसुबा आहे. पण आम्हांला अजून मूलबाळ कांहीं नाहीं. तेव्हां ही सरदारीची सनद आमच्या वंशांत रहावी कशी ? पण एकादं लग्न करून जर--

**नभाजी**:—( हंसत ) मानाजीराव, आपण लग्न तरी किती करणार आहांत ? चार कुटुंबं असूनसुद्धां--

**मानाजी**:--अशीं चार पांच लग्नं करून का कुठं भागत असतं ? मोठ्यांचा मोठेपणा-पुष्कळ लग्नं केल्यानं वाढत असतो ! कृष्णालासुद्धां सोळा हजार एकशें आठ स्त्रिया होत्या ! शिवाय संततिकरितां लग्न करावं असं शास्त्रांतसुद्धां सांगितलं आहे !

**नभाजी**:--मग-कुठं सोयरीक जमली आहे वाटतं ?

**मानाजी**:—सगळं काहीं जुळणार आहे. फक्त आपला होकार पाहिजे.

**नभाजी**:--म्हणजे ?

**मानाजी**:--स्पष्ट बोलायचं म्हणजे आपणच आमचे सासरे व्हा !

**नभाजी**:—हं मानाजीराव, तुमची ही मागणी व्यर्थ आहे. इतक्या दिवसांनीं आपलं बोलावणं येतांच, मला जो संशय आला होता-तो मात्र खरा ठरला आतां. तुम्हांला असं बोलायला शरम वाटली पाहिजे !

**मानाजी**:—लग्नाच्या बाबतींत शरम काय कामाची ? नभाजीराव, मी जर हें लग्न केलं नाहीं तर माझ्या सनदेची काय वाट ?

**नभाजी**:—तुमची ही सनदेची सबब अगदीं झूट आहे. हा सनदेचा विचार वरकांती असून-तुम्हांला माझ्या मुलीच्या सौंदर्याची सनद पाहिजे आहे. मानाजीराव, माझ्या जयंतीची आशा तुम्हीं सोडून द्या.

**मानाजी**:—मग धरा कसली ? नभाजीराव, जयंती मला न देण्याइतकं मी काय केलं आहे—कां माझ्यांत कांहीं उणेपणा आहे ?

**नभाजी**:—सभ्यतेच्या सांगाखालीं, तुम्हीं भयंकर दरोडेखोरी सुरू केलीत-राजनिष्ठेला दगा दिलांत-कित्येक स्त्रियांची अब्रू धुळीला मिळविलीत आणि तुमच्या मार्गांत आड येणाऱ्यांना-तुम्हीं नानातऱ्हेनं छळलंत-मारलंत तुरुंगांत डांबून ठेवलंत. आणि वर आणखी काय केलं आहे म्हणून विचारायला लाज नाहीं वाटत ?

**मानाजी**:--बस करा. माझी अब्रू काढून घेण्याकरितां मी तुम्हांला इथं बोलावलं नाहीं. मी कसा का असना ? त्याच्याशीं तुम्हाला काय करायचं आहे ? नभाजीराव, मी माझी ताकद ओळखूनच कुठलीही गोष्ट करीत असतो........ बऱ्या बोलानं तुम्हांला विचारतो आहे कीं तुमची जयंती मला देणार किंवा नाहीं ?

**नभाजी**:--नाहीं. हा नभाजी तुला आपली मुलगी कधींही देणार नाहीं.

**मानाजी**:--नीट विचार करा, आणि मग काय तें बोला. माझ्या अधिकारांत मला काय वाटेल तें करतां येईल.

**नभाजी**:—मी पूर्ण विचार करूनच तुम्हांला जबाब दिला आहे.

**मानाजी**:—बऱ्या बोलानं कबूल झालांत तर ठीक आहे, नाहींतर तुम्हांवर खोटी तोहमत घालून तुरुंगांत डांबून ठेवीन आणि मग जयंतीशीं लग्न लावीन. माझ्या मनासारखं जर मी कांहीं केलं, तर त्याबद्दल मला कोण विचारणार आहे ?

**नभाजी**:—महाराज, शिवाजी महाराज.

**मानाजी**:—ते पडले आहेत कुजत तिकडे तुरुंगांत ! आतां त्यांना कोण विचारतो ? आणि त्यांच्यासारख्या दरोडेखोरांची पर्वा तरी—

**नभाजी**:—हं खबरदार, महाराजांविषयीं कांहीं कमी जास्त बोललांत तर–त्यांची निंदा केलीत–त्यांचं नांव कलंकित केलंत तर तुमच्या नरडीचा घोंट घेतल्यावांचून मी रहाणार नाहीं.

**मानाजी**:—(हंसत) असं–आपल्या या जांवयाचा नरडीचा घोट घेऊन आपल्या मुलीला वैधव्य आणणार तर? नभाजीराव, अजून तुम्हांला सवलत देतो–कबूली जबाब देऊन मोकळे व्हा.

**नभाजी**:—तुमच्या बोलण्याला कबूली देऊन, माझी जयंती–तुमच्या-सारख्या सैतानाला देऊं? मानाजीराव, ज्यानं तुम्हांला एवढ्या मोठ्या पदाला चढवलं त्याच्याशीं अखेर बेईमान झालांत.

**मानाजी**:—बस कर तुझी बडबड. आज सकाळीं तुमच्या त्या तोंडाळ पोरीनं देवीच्या देवळात माझ्या मागणीचा इन्कार करून, माझा अपमान केला आहे मला नाहीं नाहीं तें बोलली आहे.

**नभाजी**:—फार चांगलं केलन तिनं. तुमची कान उघाडणी तिनं केली असेल तर त्यांत काय बिघडलं?

**मानाजी**:—काय बिघडल? या अपमानाची भरपाई करण्याकरितां मला तिच्याशीं लग्न लावलंच पाहिजे. तेव्हां बऱ्या बोलानं कबूली द्याल तर सुटाल नाहींतर बिकट प्रसंग येईल.

**नभाजी**:—माझा प्राण गेला तरी बेहत्तर–पण तुम्हांला संमती देणार नाहीं. चला, सोडा माझी वाट.

**मानाजी**:—हं खबरदार पुढं पाऊल टाकाल तर? या क्षणीं कबूली-करार नाहींतर तुरुंग.

**नभाजी**:—तुरुंग पत्करीन पण कबूली देणार नाहीं.

**मानाजी**:—कोण आहेरे तिकडे (शिपायी येतात) चला यांना कैद करा.

[ शिपाई नभाजीरावाला पकडतात तोंच दौलतराव लगबगीनें साखरपाणी घेऊन येतो. ]

**दौलत**:—सरकार, साखरपाणी!

**मानाजी**:—साखरपाण्याकरितां यांना बोलावलं, तर हे समजून उमजून कैदपाणी स्वीकारीत आहेत.




मानाजीराव:—हं. खबरदार पुढं पाऊल टाकाल तर!

**दौलतः**—कां हो ? घ्या ना हें साखरपाणी !

**नभाजीः**—चल जा हलकटा.

**दौलतः**— दैव देतं आणि दुर्दैव नेतं तें इथंच.

**मानाजीः**—नभाजीराव, अजून तरी हट्ट सोडा. एका शब्दानं आपल्या सगळ्यांचं कल्याण होईल.

**नभाजीः**—पण माझ्या लौकिकाचं वाटोळं होईल ना. मानाजीराव, तुम्हीं मला दगलबाजीनं पकडलं आहांत तरी तुमचा हेतु पूर्ण होणार नाहीं हं याद राखून असा.

**मानाजीः**—( स्वगत ) हा थेरडा पैशाचा लोभी आहे ! ( उघड ) पहा बुवा नभाजीराव, या लग्नानं माझी सारी संपत्ती तुम्हांला मिळेल–तुमचा केवढा मोठा मानमरातब वाढेल–आणि तुम्हीं अगदीं ऐषआरामांत राहून–

**नभाजीः**—संपत्ती मिळेल ? मानमरातब वाढेल ? आणि ऐषआरामसुद्धां–

**मानाजीः**—माझी सारी संपत्ती आतां या क्षणीं देऊं ?

**नभाजीः**—नको नको. आतां कांहीं नको...पण मला या बाबतींत जयंतीला विचारलं पाहिजे.

**मानाजीः**—नभाजीराव, तुमच्या जयंतीमुळं, सारी संपत्ती तुमच्या पदरीं अनायासं पडत असतां तिला लाथ कां मारतां ? पैशामुळं शत्रूदेखील मित्र बनत असतात; मग तुम्हीं आम्हीं काय घोडं मारलं आहे ?

**नभाजीः**—तसं कांहीं नाहीं....पण महाराजाविषयीं...

**मानाजीः**—सोडारे त्याना, चला जा तुम्हीं. ( शिपाई जातात ) शिवाजीमहाराज आग्र्याहून सुटून दक्षिणेंत परत येतील असं तुम्हाला वाटतं ? हा तुमचा भ्रम आहे. त्यांची सुटका होण्याची गोष्टच सोडून द्या. औरंगजेबासारख्या कडव्या पातशहाच्या कैदखान्यांतून सुटून येणं म्हणजे प्रत्यक्ष काळाच्या जबड्यांतून सुटून येण्याइतक बिकट आहे.

**नभाजीः**—मग तुमची ही मागणी मी आनंदानं कबूल करतो. पण माझी मुलगी गुणी आहे कीं नाहीं ?

**मानाजीः**—म्हणून तर तिच्याकरितां हा सारा खेळ चालला आहे.

[ स्वगत ] सुटका करून घेण्याकरितां हा खोटं तर बोलत नसेल ? याला शपथेनं पुरतं बांधून घेतलं पाहिजे. [ उघड ] दौलत साखरपाणी !

**दौलतः**--हें-हें घ्यावं सरकार. केव्हांपासून मी हें घेऊन इथं उभा आहें, पण वेळच आली नव्हती.

**मानाजीः**—पण आतां आली आहेना ! घ्यावं नभाजीराव, साखरपाणी घ्यावं. आपल्याकरितां मुद्दाम तयार करवलं आहे हें ! घ्या हें. आणि या साखरपाण्यासारखं कार्य गोड करून टाका.

**नभाजीः**—हो हो अगदीं जरूर करतों.

**मानाजीः**—पोकळ आश्वासन नको आहे मला. शपथ घेऊन खात्री पटवून द्या.

**नभाजीः**—माझ्याविषयी अजूनही तुम्हांला संशय येतो ?

**मानाजीः**—छे–छे–तसं कांहीं नाहीं पण आपलं शंकेचं निरसन झालेलं बरं. का खरं कीं नाहीं दौलत ?

**दौलतः**—हो–हो सरकार, अगदीं खरं आहे !

**नभाजीः**—मी या गंगाजलाची शपथ घेऊन सांगतो कीं मी माझ्या मुलीचं जयंतीचं लग्न, मानाजीराव मान्यांबरोबरच करून देईन.

**मानाजीः**--आतां माझं समाधान झालं. हा माझा-आपल्या जांवयाचा मुजरा घ्यावा !

**नभाजीः**—अहो–अहो, ही काय भलतीच थट्टा !

**दौलतः**--छे–छे–छे–असं कुठं झालंय ! सासेरबुवांना योग्य तो मानमरातब दिलाच पाहिजे !

**मानाजीः**--आतां घरीं गेल्यावर जयंतीला ही आनंदाची हकीकत कळवा हं ! आणि पुढं कसं काय करायचं....तें आपण मग ठरवूं.

**नभाजीः**--बरं तर मी आपली रजा घेऊं ? ( जाऊं लागतो )

**मानाजीः**—नभाजीराव, मघांच्या बोलण्याबद्दल राग धरायचा नाहीं बरं कां ?

**नभाजीः**--भलतंच झालं तें होऊन गेलं, तें काय मनांत ठेवायचं ? (जातो)

**मानाजीः**--अरे लोभी प्राण्या ! स्वामिनिष्ठपणाच्या लांबलांब गप्पा काय मारल्यास--राजनिष्ठेची घमेंड काय मिरविलीस--विश्वासूपणाचं अवडंबर काय माजवलंस ! पण अखेर पैशाच्या लालचीनं या सर्वांवर तिलांजली दिलीस. मनासारखा खेळ खेळतांना हा पैशाचा फांसा हरघडी चांगला उपयोगी पडत असतो. या पैशाच्या प्रभावानं काय वाटेल तो डाव सहज जिंकता येतो, आणि या पैशामुळंच जयंती मला मिळणार आहे. जयंती, मानी पोरी ! आतां मात्र तूं माझी झाली आहेस. आणि माझ्या अपमानाचा सूड, तुला चांगलं छळून काढल्याशिवाय मी रहाणार नाहीं. दौलत, आतांच्या आतां जाऊन, हंबीरराव मोहित्यांच्या वाड्याची जप्ती कर.

**दौलतः**--[ भीत भीत ] पण सरकार--मला--

**मानाजीः**--[ एकदम ओरडून ] सरकार बिरकार कांहीं नाहीं. हुकूम म्हणजे हुकूम !

**दौलतः**--होय....होय....सरकार....[ रडवा चेहरा करीत ]

---

## प्रवेश २ रा

**स्थळः**--नभाजीरावांचा वाडा.

**जयंतीः**--देवळांतील त्या प्रसंगाची आठवण झाली, कीं मनाला कशी अगदीं हुरहुर लागते. बाबाना ही गोष्ट मी कां बरं सांगितली नाहीं ? आईच्या विरहानं आधींच दुःखांत असलेल्या त्यांच्या जिवाला माझ्या सांगण्यानं जास्त दुःख मात्र व्हायचं. मानाजी बाबांना सांगेल का ? छे, कुठला गुन्हेगार राजीखुषीनं आपला गुन्हा दुसऱ्यांना सांगत सुटेल ? बाबा, आपल्याजवळ मी करीत असलेल्या वंचनेबद्दल मी आपली क्षमा मागते. बाबा, त्या दिवसापासून हंबीरराव माझ्या हृदयाचे खरोखर देव बनले आहेत. त्यांना या हृदय-सिंहासनावर बसवून पंचप्राणांच्या प्रेमपुष्पांनीं मी त्यांचं पूजन करीत आहे.

**पद**

**मानस मंदिरीं ॥ प्रेम-सख्याला ॥**
**गडे फुलांची ॥ वाहिन माला ॥ध्रु०॥**
**दीप लावुनी ॥ नयन ज्योतिचा ॥**
**करीन आरती ॥ प्रेम पूजेला ॥१॥**
**प्रेम सुधारस ॥ मधुमय प्याला ॥**
**देईन प्याया ॥ प्यार जीवाला ॥२॥**
**हृदय वीणेवरी ॥ गाउनी गाना ॥**
**रमवीन माझ्या ॥ प्राणप्रियाला ॥३॥**

तरुण रमणीनं आपल्या प्रियकराचं पूजन असंच करायचं असतं ना ?

( नभाजीराव येतात. )

**नभाजीः**—हो. हो. असंच करायचं असतं ! कोण तुझा प्रियकर ?

**जयंतीः**—कोण ? तें आपल्याला ठाऊक आहे.

**नभाजीः**—तो हंबीर !

**जयंतीः**—हो.

**नभाजीः**—त्याचं नांवसुद्धां पुन्हा घेऊं नकोस. त्याच्याशीं तुझं लग्न होणं शक्य नाहीं.

**जयंतीः**—बाबा, काय बोलतां आपण हें ? आपल्या स्वर्गस्थ मित्राला आणि माझ्या आईला, माझं लग्न हंबीररावाशीं लावून देईन, असं तुम्हीं वचन दिलं आहांत ना.

**नभाजीः**—खुळे पोरी, तो काळ निराळा होता--आजचा काळ निराळा आहे. त्यावेळचे माझे विचार आतां बदलले आहेत.

**जयंतीः**—बाबा, तुम्हींच का हें बोलतां ?

**नभाजीः**—हो. हो. आणि मी कांहीं खोटं बोलत नाहीं.

**जयंतीः**—खऱ्याखोट्याचा शहानिशा करणाऱ्या त्या परमेश्वराच्या न्यायी न्यायासनासमोर तुम्हांला जबाब द्यावा लागेल. या लोकींसुद्धां तुम्हाला जबाब विचारणारे शिवाजीमहाराज, कपटी करणीनं बंदिवासांत पडले आहेत, ते

आज ना उद्यां खात्रीनं सुटतील, मग त्यांच्यासमोर तुम्हांला मान खालीं घालावी लागेल–माफी मागावी लागेल. बाबा, मराठ्यांना माफी मागण्यापेक्षां मरण बरं वाटत असतं !

**नभाजीः**––महाराजांच्या सुटकेसंबंधीं तुझे विचार अगदींच पोरकट आहेत. त्यांचं तुरुंगांतून सुटणं म्हणजे आकाशाला गवसणी घालण्यासारखं आहे. जयंती, यापुढं तुला माझ्या सांगण्याप्रमाणं चाललं पाहिजे. कारण मी तुझा बाप आहे !

**जयंतीः**—बापाची प्रत्येक आज्ञा मुलीनं मानलीच पाहिजे असं कांहीं नाहीं. पण बाबा, माझ्याकरिता आपण सोयरीक तरी कुठली पाहिली आहांत ?

**नभाजीः**––मानाजीराव माने. त्यांचीच गांठ घेऊन मी इथं आलों आहे.

**जयंतीः**—अगबाई ( स्वगत ) घात झाला. दुष्टानं दावा साधला–– बाबांना फितवलं ( उघड ) बाबा, मानाजीजवळ लग्न करण्यापेक्षां मला मरण बरं वाटतं.

**नभाजीः**—कां—फारशी जीभ लांब करीत चालली आहेस ? त्या माना- जींत असं काय कमी आहे ?

**जयंतीः**—त्यांचीं अजून किती लग्नं व्हायचीं बाकी आहेत ? त्याच्या पापी वासनेंत प्रत्यक्ष पोटच्या पोरीचा बळी द्यायला कशाकरितां तयार झालां आहांत ?

**नभाजीः**––तुझ्या सुखासाठीं.

**जयंतीः**––ही सुखाची कुठली कल्पना बाबा ?

**नभाजीः** —कल्पना नव्हे सत्य आहे. माझा यांत कांहींच स्वार्थ नाहीं. जयंती, तूं या बोरगांवची राणी होशील–मोठ्या मानानं–आणि मजेनं मिरवि- शील. अग सगळे लोक तुला केवढा मोठा मान देतील मान !

**जयंतीः**––असल्या खोट्या मानाला हपापलेली मी नाहीं. आणि तुम्हीं, माझ्या भावी सुखाची सांगता वचनभंग करून करणार ? कसाबाच्या हातीं गरीब गाईची मान देऊन सुखाची आशा करणार ? बाबा, हा प्रश्न माझ्या सुखाचा नसून आपण आपल्या स्वार्थाकरितां हा हिकमती डाव खेळत आहां !

**नभाजी**:—बस कर, आतांपर्यंत तुझं बोलणं मुकाट्यानं मी ऐकून घेतलं, पण लक्षांत ठेव, तुझं लग्न मानाजींबरोबरच झालं पाहिजे. ही माझी आज्ञा तुला मानलीच पाहिजे.

**जयंती**:—आपली ही आज्ञा मी झुगारून देत आहे. आजन्म कुंवार राहीन पण मानाजीशीं लग्न म्हणून करणार नाहीं.

**नभाजी**:—बरं-बरं. पाहूं आपला विचार कोण बदलतो तो! नीट विचार कर आणि मग उत्तर दे. (जातो)

**जयंती**:—बाबा, आपला सर्व बेत मला समजला. माझ्या सुखापेक्षां तुम्हांला द्रव्याची, मानपानाची हांव जास्त आहे. तुम्हीं मानाजीच्या मायावी बोलण्याला भुललां आहात? मरणघडीं मित्राला दिलेलं वचन पैशाकरितां खोटं करायला तयार झाला आहांत. आपल्या या निंद्य करणीबद्दल आपले स्वर्गस्थ मित्र मोहिते आपला धिःक्कार करीत असतील. आणि या विश्वासघाताबद्दल हंबीररावांना काय वाटेल? नाथ, बाबा फिरले तरी मी त्यांची मुलगी कधींहि फिरणार नाहीं....आई....आई....आतां तुझ्यावांचून मला वचन पाळण्याचं सामर्थ्य कोण बरं देईल? ( रडूं लागते तोंच प्रताप येतो )

**प्रताप**:—आं? ताई–तूं रडतेस?

**जयंती**:—छे! कुठं?

**प्रताप**:—हे अश्रू काय दाखवीत आहेत?

**जयंती**:—उगीच कांहींतरी!

**प्रताप**:—उगीच रडणं? आपल्याला नाहीं येत! कोण तुला बोललं? कुणी तुला दुःख दिलं? त्याला मी चांगलाच हात दाखवितों–छे,–छे–अजून तूं रडते आहेस.

**जयंती**:—कुठं रडतें आहे मी? तुला कांहीं तरी भास झाला असेल!

**प्रताप**:—वा! मला कांहीं समजत नाहीं असं तुला वाटतं? हे पहा तुझे डोळेच काय तें सांगत आहेत. असा जागता पुरावा दिसत असतांना, भास कसा काय होणार मला? असं खोटं बोलून मला फसवूं पहातेस होय?

**जयंती**:—नाहीं बाळ, जरा आईची आठवण झाली म्हणून—

**प्रताप**:--ऊं हूं, मला नाहीं खरं वाटत? माझ्या समजुतीकरितां तूं कांहीं तरी सांगतेस झालं !

**जयंती**:--तूं शहाणा ना ?

**प्रताप**:--कबूल, पण शहाण्यानं जर नीट चौकशी केली नाहीं तर तो शहाणा कसला !

**जयंती**:--शर्थ झाली गडे तुझ्या बोलण्यापुढं ( हंसते. )

**प्रताप**:--( हंसून ) हं, आतां बोल.

**जयंती**:—तुला एक काम सांगतें-तें बिनचूक करशील ?

**प्रताप**:--हो ! हो.

**जयंती**:—मोहित्यांचा वाडा तुला ठाऊक असेलच्च ?

**प्रताप**:--कुठले मोहिते हे ? कितीतरी मोहित्यांचे वाडे या गांवांत आहेत ! नांवाशिवाय कसं काय कळणार मला ?

**जयंती**:—( हळूच ) हंबीरराव मोहिते.

**प्रताप**:—कोण-कोण ? पुन्हां सांग पाहूं ? आपल्याला ऐकूं आलं नाहीं बरोबर ?

**जयंती**: --चल लबाड कुठला ! आतां नाहीं मी सांगायची.

**प्रताप**:—नको सांगूस. काम कांहीं माझं नाहीं.

**जयंती**:—असं काय करतोस तूं ? माझं ऐकणार ना ?

**प्रताप**:--वा....ऐकत नाहीं असं कधीं म्हटलं मी ? हा काय भलताच आळ माझ्यावर ?

**जयंती**:—तुला एक पत्र देतें तेवढं त्यांना नेऊन दे.

**प्रताप**:—पण-त्यांना म्हणजे कुणाला ?

**जयंती**:--तुला काय करायचं आहे ? त्यांनाच !

**प्रताप**:—पुन्हां त्यांनाच ! हा "त्यांनाचा" उलगडा कसा कळावा मला ?

**जयंती**:--आतांशा तूं फारच हट्टी बनत चालला आहेस !

**प्रताप**:--ताई, चांगली आहे तुझी शाबासकी !

**जयंती**:--तुझ्याजवळ मी आतां बोलतच नाहीं.

**प्रताप**:—अररररर, ही तर मोठी पंचाईत ! ताई, मी तिकडे जातों, तुझं पत्रही देतों-पण अशी रागावूं नकोस तूं !

**जयंती**:—नाहींतर पुन्हां आपलं नांव....

**प्रताप**:—सगळं कांहीं मला ठाऊक आहे. पण तुझा राग मात्र....

**जयंती**:—वेडा कुठला ? तुझ्यावर मी कधीं तरी रागावेन होय ?

**प्रताप**:—हो करता काय ? पण ताई, तूं जरी रागावलीस तरी तुझं प्रेम म्हणजे—

पद.

**वानुं तुझ्या प्रेमा ॥ अति थोर थोर महिमा ॥**
**भाव मनींचा निर्मल साचा ॥ नाहीं तुलना प्रेमा ॥ ध्रु० ॥**
**वंदिती कान्हा जगदांतरीं ॥ गाजे हा द्रौपदी भ्राता ॥ १ ॥**

---

## प्रवेश ३ रा

**स्थळ**:—हंबीररावाचा वाडा

**हंबीर**:—या अंदाधुंदीच्या काळांत, कुणाची कुठं आणि कव्हां आहुती पडेल याचा भरंवसा नाहीं. शिवाजी महाराजानीं चालू केलेली ती उत्कृष्ट राज्यपद्धती कुणीकडे, आणि त्यांच्या तुरुंगवासाचा फायदा घेऊन मानाजी सारख्या कांहीं स्वार्थी अधिकाऱ्यानीं, स्वतःचा बडजाव दाखविण्याकरितां त्यांची ती राज्यपद्धती बदलून टाकून-स्वत: चालू केलेली ही सैतानी बेबंदशाही कुणीकडे. हे बेजबाबदार अधिकारी सत्तेच्या धुंदींत कुणा सन्माननीय माणसाला ठार मारायला किंवा विनाकारण तुरुंगांत कोंडून ठेवायला कमी करायचे नाहींत. याला कारण एकच, आणि तें म्हणजे लोभ. कुणाला सत्तेचा लोभ-तर कुणाला वैभवाचा लोभ. कुणाला सौंदर्याचा लोभ-तर कुणाला पैशाचा लोभ. हा लोभच सर्वस्वाच्या नाशाला कारण होत असतो.

**पद**

**जन निंदिती लोभा ॥ मोहुनी**
**सकला ने विलया सुलभा ॥ धृ० ॥**
**फसवीत आशा ॥ करूनी निराशा ॥**
**वंचुनि सुखलाभा ॥ १ ॥**

कोण प्रताप? कां आलास? ( प्रताप येतो. )

**प्रताप**:--ताईनं हें पत्र दिलं आहे.

**हंबीर**:--( पत्र वाचून ) अरेरे. नभाजीरावसुद्धां या पैशाच्या लोभाला बळी पडले अं? प्रताप, जयंती काय करते आहे?

**प्रताप**:--मी आलों तेव्हां विचार करीत बसली होती. कारण विचारलं तर ती सांगेचना!

**हंबीर**:--बरं. मी लौकरच येतों म्हणून सांग तिला.

**प्रताप**:—जरूर या हं. आपल्या येण्यानं ताईला आनंद होईल!

**हंबीर**:—पण हें तुलारे कसं समजलं!

**प्रताप**:—त्यात काय कठीण आहे? आपल्या भेटीच्यावेळीं ताई आनंदांत असते, इतर वेळीं, ऊं हूं.

**हंबीर**:—बराच हुषार आहेस म्हणायचा तूं!

**प्रताप**:—छे! छे! तसं कांहीं नाहीं. बरं येतों मीं! ( जातो. )

**हंबीर**:—जयंती, आपल्या वडिलांप्रमाणं तूंही मला दगा देणार नाहींसना? आशेच्या मृगजळामागं लागलेल्या माझ्या जीवाची फसगत तर होणार नाहींना? पण नाहीं. तुझ्या मनाचीसुद्धा परीक्षा-अरेच्या, हे मानाजींचे लोक या वेळीं इकडे कां येत आहेत? (दौलतराव शिपायांसह येतों.) कोण पाहिजे तुम्हांला?

**दौलत**:—खुद्द तुम्ही. हंबीरराव मोहिते पाहिजे आहांत.

**हंबीर**:--हा मी इथं हजर आहे. काय काम आहे आपलं?

**दौलत**:--आम्हांला आपली जप्ती करायची आहे!

**हंबीर**:—माझी जप्ती करायची आहे?

**दौलत**:—अरेरे, चुकलंच की ! तसं नव्हे हो. आपल्या वाड्याची जप्ती करायची आहे.

**हंबीर**:—माझ्या वाड्याची जप्ती ? ती काय म्हणून ?

**दौलत**:—मानाजीराव मान्यांच्या हुकूमावरून.

**हंबीर**:—पण माझा अपराध ?

**दौलत**:—अपराध ! अपराध आहे नाजुक ! मानाजीरावांनीं फर्मावलं आहे कीं कुणाला सांगू नकोस. पण तुम्हाला म्हणून सांगतो; देवळांत तुम्हीं जो त्यांचा अपमान केलात त्याचा हा सूड आहे. पण हें सगळं गुप्त ठेवा बरं का ! हं मग चला. आतां हुकमाप्रमाणं आम्हाला जप्ती करायची आहे. चला घराबाहेर पडा.

**हंबीर**:—मी माझ्या घराबाहेर पडूं ? नाहीं. जा, त्या मानाजीला घेऊन ये इथं.

**दौलत**:—मानाजीराव कशाला पाहिजेत ? आणि मी माझं हें अपेशी तोंड घेऊन परत जाऊं वाटतं ? अहो, माझ्याशीं जरा नीट वागा. असं हिडीसफिडीस करूं नका.

**हंबीर**:—चल मूर्खा, चालता हो इथून तूं.

**दौलत**:—हं मूर्खबीर्ख बोललांत तर संभाळून असा. ही पाहिलीत माझी तलवार !

**हंबीर**: तलवारीची भीति तुझ्यासारख्या भित्र्या माणसाला !

**दौलत**:—( स्वगत ) अद्याप मी भित्रा अं ? इतकी धमकावणी दिली—इतका रुबाब दाखविला—तरी मी भित्राच ! आतां असं नाहीं उपयोगी (उघड) अहो, उगाच वटवट नको आहे. दाखवितो आपल्याला मी कसा काय भित्रा आहे तो ! शिपायांनो, पहाता काय. खेंचून काढा बाहेर.

**हंबीर**:—देशद्रोह्याच्या घरीं गुलामगिरींत तुकडे मोडणाऱ्या कुत्र्या ! तुझ्यांत माणूसकी बिलकूल नाहीं. आपला अधिकार चालवितांना कांहीं विचार करायचा होतास. आपलं टीचभर पोट जाळण्याकरितां, वाटेल तें निंद्य वर्तन करणाऱ्या मगरूर कुत्र्या ! हें घे बक्षीस. मानाजीच्या सहवासानं

तुझ्या अंगीं जडलेलीं पापं एकाच वारानं नाहींशी करून टाकतो ( तरवार काढून त्याला मारायला जातो, दौलतराव घाबरून जाऊन शिपायांच्या पाठीमागें लपूं पहातो, हंबीरराव त्याला खेंचून बाहेर आणतो, हें पाहून शिपाई लढायला तयार होतात. )

**दौलत**:—नाहीं...नाहीं चुकलों, चूक झाली. माफ करा. पायां पडतों मी आपल्या. ( पायां पडतांना जाणून बुजून आपली पगडी खालीं पाडतो ) ही पहा माझी पगडी पडली ! लढायला अपशकून झाला. अस्सल मराठा वीर, पगडी पडली तर केव्हांच लढायला तयार होत नसतो. करा, एवढी दया या दौलतीवर करा. शरण आलेल्यांवर दया करणं हा मोठा धर्म आहे, आणि आपण खरोखर मोठे शूरवीर आहांत असं मी अगदीं बेलाशक कबूल करतों.

**हंबीर**:—शत्रूशीं सामना देणारी तलवार–तुझ्यासारख्या नामर्दांच्या रक्तानं अपवित्र करूं ? माझ्या संपत्तीकरितां मी आपल्याच लोकांवर शस्त्र चालवूं ? महाराज तर मोठमोठे बिकट प्रसंग रक्तपात केल्याशिवाय टाळीत असतात. आणि मी, निव्वळ स्वार्थाकरितां रक्तपात करूं ? आपल्या देशाकरितां वाटेल तो स्वार्थत्याग करण्याची माणसाची तयारी असली पाहिजे, या महाराजांच्या आज्ञेचा भंग करून मी कर्तव्यपराङ्मुख होऊं ?

**दौलत**:—कां हो, विचार कसला चालला आहे ?

**हंबीर**:—हा मोह टाळलाच पाहिजे. तुम्हांला जें कांहीं करायचं असेल तें करून घ्या.

**दौलत**: —पण–तुम्ही आम्हांला मारलंत तर ? पाहिजे तर पुन्हां पायां पडतों. नाक घासतो. आम्ही काय नोकर माणूस !

**हंबीर**:—जातीनं तूं मराठाच आहेस कारे ?

**दौलत**:—हो ! हो ! ! मी तर अस्सल मराठा आहें ! माझं नांव दौलतराव जगताप ! माझ्या जातीविषयीं भलताच संशय घेऊं नका.

**हंबीर**:—स्वत:ला मराठा म्हणवितोस आणि असलीं कामं कां करतोस ?

**दौलत**:—पोट जाळण्यासाठीं.

**हंबीरः**—पोट जाळण्यासाठीं दुसरीं कामं नाहींत वाटतं ? तुझ्यासारखे पोटभरू लोक, असलीं हलक्कीं कामं करून मराठ्यांच्या नांवाला बट्टा लावीत आहेत.

**दौलतः**—तो बट्टा लागेल तेव्हां लागेल पण आतां माझ्या प्राणाचा चट्टा व्हायची वेळ आली आहे ना ?

**हंबीरः**—मला पकडायला तुम्हांला हुकूम आहे का ?

**दौलतः**—नाहीं, पण तुम्हीं इथं असल्यामुळं—

**हंबीरः**—तुम्हांला धीर होत नाहीं असंच ना ? अहारे शिपाई ! तुम्हांला शिपाई म्हणण्यापेक्षां बायका म्हणणं जास्त शोभेल !

**दौलतः**—( स्वगत ) इथं मात्र चुकतं आहे. माझी बायको भित्री नसून चांगली शूर आहे.

**हंबीरः**—आतांपर्यंत मी ताब्यांत ठेवलेला माझा राग अनावर होऊन भलताच प्रसंग यायचा, तर येथून निघून जावं हेंच बरं ! ज्या ठिकाणीं माझा जन्म झाला. जिथं मी लहानाचा मोठा झालों-मोठ्या आनंदानं जिथं मी दिवस घालविले, तें ठिकाण माझ्या ध्येयाकरितां मला सोडणं भाग आहे. कर्तव्याकरितां मला माझ्या जन्मभूमीचा त्याग करावा लागत आहे. जय जन्मभूमी ! ( वंदन करून निघून जातो. )

**दौलतः**—हुश्श ! काळ गेला. जाऊं द्या कोकलत ! काय बेट्यानं मला नाचवलं तरी ! याच्या धमकावणीनं मी मृत्युलोकीं जाऊन आतां या द्रव्यलोकीं येऊन पोचलों आहे ! कायरे भित्र्यांनो असे पहात काय उभे राहिलांत ? जा, आंत वाड्यांत जाऊन वाडा अगदीं खालीं करून टाका. मोडकी केरसुणी, तुटकी वहाण, फाटलेलीं लक्तरंसुद्धां घ्यायला विसरूं नका. दगड, धोंडे, मातीसुद्धां घ्यायची आहे. ( शिपाई आंत जातात, दौलतराव रुबाबांत फिरूं लागतो. फिरतांना त्याच्या पायाला पडलेली पगडी लागते, प्रथम दचकतो. नंतर चोहीं बाजूंना भीत भीत पहात पगडी उचलतो व तिला हातीं धरून ) आज तूं होतीस म्हणून मी वाचलों. तुझे उपकार मी जन्मभर विसरणार नाहीं. (पगडी डोक्यावर ठेवतो. शिपाई पेट्या वगैरे सामान घेऊन येतात. त्यांतील

एक पेटी उघडून दागदागिने पहात ) आतां ? हुं ! आपली बायको पडली कजाग ! तिचं तें खच्याळ तोंड बंद करण्याकरितां हे दागिने तिच्या तोंडावर टाकले की झालीच तिची बोलती बंद ! ( दागिने घेऊं लागतो. )

---

## प्रवेश ४ था

**स्थळः**—नभाजीच्या वाड्यांतील बाग.

**जयंतीः**--प्रेम आणि कर्तव्य यापैकीं मी कुठलं श्रेष्ठ समजूं ? प्रेमाकरितां कर्तव्याला पराङ्मुख होणं शोभेल, का कर्तव्याकरितां प्रेमाला पारखं झालेलं जास्त शोभेल ? कर्तव्याकरितां प्रेमाचासुद्धां त्याग करायला नको का ? परमेश्वरानं आम्हां स्त्रियांवर, या कर्तव्याची जबाबदारी पुरुषापेक्षां जास्त प्रमाणांत ठेविली आहे. मग ती आम्हांला पार पाडायला नको का ? मी माझ्या कर्तव्याला जागलें, हें हंबीररावांना समजलं तर त्यांना किती आनंद होईल !

**हंबीरः**—( प्रवेश करून ) आनंदाचं नांवसुद्धां यापुढं काढूं नकोस !

**जयंतीः**— अगबाई—काय बोलता हें ?

**हंबीरः**---येऊं नये तो प्रसंग आल्यामुळं माझ्या वाट्याला निराशा आली आहे. आज तुझी शेवटची भेट घेण्याकरितां मी इथं आलों आहे.

**जयंतीः**—मी काय समजावं यांत ? सुखाच्या वेळीं, जसं आनंदानं तुमचं स्वागत करीत आलें, तसंच या दुःखाच्या वेळीं देखील मी आपली समभागी होइन. पण खरंच, असं झालं आहे तरी काय ?

**हंबीरः**—मानाजीनं द्वेषाग्नीनं दावा साधून सूड उगविला. माझं घरदार जप्त केलं आहे आणि अपमान करून मला घराबाहेर काढलं आहे.

**जयंतीः**—आणि त्यामुळं आपण असे वैतागी बनला आहांत. पण अपमानाच्या एका प्रसंगानं माणसानं असं निराश होऊं नये.

**हंबीरः**---मग काय असा अपमान सोसून स्वस्थ बसूं ? मला किती आशा होती म्हणून सांगूं ?

**जयंतीः**—आशेच्या चक्रांत सांपडलेला प्राणी निराशेचे गिरके खात असतो.

**हंबीर:**—महाराजांना दिलेलं वचन पाळण्याकरितां हा सगळा अपमान मी मुकाट्यानं सहन केला नाहींतर मी मानाजीला चांगलाच हात दाखविला असता. माझ्या अब्रूचे हे धिंडवडे निघालेले पाहून—बाहेर तोंड दाखवायला-सुद्धां मला लाज वाटूं लागते. म्हणून आज तुझी शेवटची भेट घेऊन मी दूरदेशीं जायचा बेत केला आहे.

**जयंती:**—आपणच का बोलता हें ? तुम्हीं देशभक्त म्हणवून घेतां ना ? देशभक्तांना स्वतःच्या सुखाची पर्वा नसेत. ऐश्वर्याची हांव नसते, आणि अपमानाची चाडही नसते, देशभक्त स्वतःच्या परिस्थितीचा विचार न करतां, देशाच्या परिस्थितीशीं समरस होत असतात. आपल्या देशाच्या उद्धाराकरितां ते तनमनधन अर्पण करतात. सर्व सुखांवर पाणी सोडून तुरुंगांत जातात. आणि तिथं तुरुंगालासुद्धां ते स्वराज्याश्रम बनवितात. त्यांना तुरुंगांत जाणं म्हणजे एखाद्या पुण्यक्षेत्राची यात्रा करण्यासारखं वाटतं ! या लोकांनीं देशाकरितां स्वीकारलेला तुरुंगवास म्हणजेच " **तुरुंगाची यात्रा.** " अशा यात्रा करणं ज्याच्या नशिबीं असतं तो खरोखर भाग्यवान म्हटला पाहिजे. आणि आपण एका क्षुल्लक कारणाकरितां आपल्या जन्मभूमीचा त्याग करायला तयार झालां आहांत.

**हंबीर:**—माझं मन इतकं दुबळं झालं आहे, कीं मी काय करावं तेंच मला समजत नाहीं.

**जयंती:**—आपण पुरुष आहांत—वीर आहांत. पाण्यांत बुडणारासुद्धां काडीच्या आधाराची अपेक्षा करीत असतो. पण मनुष्याचा मनाचा दुबळेपणा मात्र त्याच्या गुणाचं वाटोळं करीत असतो.

**हंबीर:**—जयंती, इथं राहून दुःख, त्रास, अपमान, सहन करण्यापेक्षां—आपण लग्न करून दूरदेशी जाऊं, आणि तिथं कुणाची तरी नोकरी करून सुखानं काळ कंठू !

**जयंती:**—छे, नाहीं ऐकवत हे शब्द. महाराज, स्पष्ट सांगतें—तुमच्या-सारख्या दुबळ्या मनाच्या माणसाबरोबर मी माझी जिवीतयात्रा पुरी करूं इच्छीत नाहीं. आपल्या सुखाकरितां मातृभूमीशीं बेइमान होणाऱ्या माणसाशीं मी लग्न करूं इच्छीत नाहीं.

**हंबीर:**—नको जयंती मला झिडकारूं नकोस. मी काय केलं असतांना तुला समाधान वाटेल ?

**जयंती:**—हा अपमानाचा छंद सोडून द्या, आणि जुलमी लोकांच्या त्रासांतून देशाला मुक्त करायचा प्रयत्न करा.

**हंबीर:**—असला प्रयत्न करण्यापेक्षां तुला वश करून घेणं, मी जास्त महत्वाचें समजतो.

**जयंती:**—मोहित्यांच्या पूर्वजांनीं तुमच्या शूर कुळांतील एका कुलदीपकाची ही प्रेमयाचना ऐका, आणि सुंदर स्त्रियांचा अभिलाष बाळगून; देशाशीं बेइमान होणाऱ्या तुमच्या कुलाची ही हीनावस्था पहा. महाराज, एका बिकट प्रसंगीं माझं रक्षण केलंत याबद्दल मी आपली आभारी आहे. पण आतां आपल्या बुद्धीला भ्रम झाल्यामुळं, आपण राजाशीं, राष्ट्राशीं, देशाशीं दगा करायला तयार झालां आहां. म्हणून ही जयंती, लहानपणापासून मनांत बाळगलेल्या आशेला तिलांजली देते—आपल्या प्रेमाचा त्याग करते.

**हंबीर:**—जयंती, नीट विचार कर. मला दिलेल्या वचनाशीं तूं बेइमान होत आहेस.

**जयंती:**—देशद्रोही माणसाशीं बेइमान होणं पाप नसतं. मी माझ्या प्रेमाची किंमत देशाच्या कल्याणापुढं जास्त मानीत नाहीं.

**हंबीर:**—जयंती, मला क्षमा करशील का ?

**जयंती:**—ती काय म्हणून ?

**हंबीर:**—तुझ्या निष्पाप हृदयाशीं मी प्रतारणा केली आहे. तुझी परीक्षा पहाण्याकरितांच मी मुद्दाम तसं बोललों.

**जयंती:**—माझ्या कटु बोलांनीं आपला विचार बदलला वाटतं! का माझा मोह अद्याप आपल्याला सुटत नाहीं ?

**हंबीर:**—नाहीं. तुझ्या प्रत्येक शब्दाबरोबर माझं मन आनंदाच्या अत्युच्च शिखरावर भराऱ्या मारीत आहे. आपल्या स्वयंस्फूर्तीच्या उत्साहानं तूं या हंबीराला देखील लाजवलंस !

**जयंती**:—माझा अभिलाष धरून, आपण माझ्याशीं प्रतारणा तर करीत नाहींना ?

**हंबीर**:—अजून तुला शंका येत असेल तर ऐक, शिवाजी महाराजांच्या पवित्र पायाचीच शपथ वाहून सांगतो, कीं जर मी माझ्या देशाशीं बेइमान झालों-तर माझे पूर्वज नरकांत पडोत.

**जयंती**:—अहाहा ! आतां माझ्या मनाचं समाधान झालं—आपल्याला मी नाहीं नाहीं तें बोललें याची मला क्षमा करा.

**हंबीर**:—कर्तव्यापासून चळलेल्या पुरुषाला योग्य कर्तव्याची जाणीव करून देणं, हें काम—स्त्रियांनाच साधत असतं. तुमच्यासारख्या स्त्रियांनीं मनावर घेतल्यावर काय होणार नाहीं ? आणि स्त्रियांनींच जगाला भूषविलं आहे:-

— पद —

**ललना खरी भूषवि जगता ॥**
**जीवनकार्या करूनी सुखमया ॥**
**आनंद जिणें सफल कराया ॥ ध्रु० ॥**
**प्रेम शांति नव तेजही धारता**
**देई ही बल स्फुरण चढाया ॥ १ ॥**

**जयंती**:—पुरुषांना स्तुतिच करायला फार हवी !

**हंबीर**:—जें सत्य आहे त्याचा गौरव करणं म्हणजे स्तुति नाहीं. पण आज मला मुद्दाम कशाकरितां बोलावलंस.

**जयंती**:—माझं पत्र वाचलंत ना ? मग पुढं काय करायचं ?

**हंबीर**:—तें-मी-तीन चार दिवसांत ठरवितो. बरं, मी आतां रजा घेऊं

**जयंती**:—पण आपण यापुढं काय करायचं ठरवलं आहांत ?

**हंबीर**:—दुःखानं पिडलेल्या लोकांना माझ्याकडून होईल तितकी मी मदत करणार आहे.

**जयंती**:—या कार्यापासून मी आपल्याला परावृत्त करूं इच्छीत नाहीं. पण आपण रहाणार कुठं ?

**हंबीरः**—जिथं हजारों माणसांना घरंदारं नाहींत तिथं माझ्यासारख्या एकट्या माणसाची काय पर्वा ? जयंती, गरिबांचं प्रत्येक घर हेंच आतां माझं निवासस्थान ! आणि त्यांची दुःखं दूर करणं हेंच माझं पुढील कार्य. येतो मी ( जातो. )

**जयंती**:—धन्य हा पुरुष ! देशाच्या उद्धाराचा अभिमान, प्रत्येक पुरुषाच्या हृदयांत जागृत करणं—हें आम्हां स्त्रियांचं कर्तव्य नाहीं का ? हंबीररावांसारख्या वीरपुरुषाची, पंचप्राणांच्या पंचरत्नांनीं ओवाळणी केली तरी ती थोडीच होणार आहे—आणि प्रियकराचा गौरव करतांना.

— पद —

**सुखविति या नवभावना ॥ गोड गोड मनिं रंगल्या ॥ धृ० ॥**
**पाहुनी शशिमुख ॥ कुमुदिनि हांसत ॥**
**नाचत डोलत ॥ रंगल्या ॥ १ ॥**

कुठं यांचा अतुल स्वार्थत्याग, तर कुठं आमच्या बाबांचा कुटील स्वार्थ ! बाबांना लागलेला हा स्वार्थाचा रोग कसा बरं नाहींसा करता येईल ? ते वाटेल तें म्हणोत, पण मी त्यांच्या बोलण्याला रुकार म्हणून द्यायची नाहीं. मी त्यांच्या तोंडावर साफ निक्षून सांगेन........( नभाजीराव येतात )

**नभाजी**:—काय—काय सांगेन ?

**जयंती**:—मानाजीशीं मी लग्न करणार नाहीं म्हणून ?

**नभाजी**:—अस्सं. जयंती, मानाजीरावांना मी शपथ दिली आहे आणि ती मला पाळलीच पाहिजे. कारण आम्हीं मराठे, शपथेची किंमत प्राणापेक्षां जास्त मानतों.

**जयंती**:—अधिकाराच्या धाकानं कैचींत पकडून, जबरदस्तीनं घेवविलेली शपथ खरी मानायची ? त्यांतून ही शपथ अशी तशी साधी नसून, प्रत्यक्ष पोटच्या पोरीचा सत्यानाश करण्याकरितां—केवळ पैशाकरितां—वचन भंग करून घेतलेली. ती पाळन करायची ? बाबा, अगदींच कसे हो कठोर बनलांत निव्वळ पैशाकरितां आपल्या मुलीच्या सर्वस्व सुखावर खरखरीत निखारे ठेवायला तयार झालां आहांत !

**नभाजी**:—जयंती, विचार कर. अशी वेळ पुन्हां येणार नाहीं. घरीं चालून येत असलेल्या लक्ष्मीला लाथ मारणं मूर्खपणाचं आहे.

**जयंती**:—मला विकून, मानाजीकडून मिळणारा पैसा तुम्हाला थोडाच वरतीं नेतां येणार ? जन्माला येतांना प्राणी जसा अकिंचन येत असतो तसाच तो शेवटीं अकिंचनच जात असतो. पण द्रव्याचं ठाणं मात्र या लोकीं कायम आहे. बाबा, आपण मात्र या कसाब करणीनं खास नरकीं पडाल.

**नभाजी**:—काय करूं रे ? उद्धट पोरी, या तुझ्या फाजील बडबडीनं तूं पितृपदाची हेटाळणी करीत आहेस ? प्रत्यक्ष बापाला नरकाचा रस्ता दाखवितेस.

**जयंती**:—कर्तव्यापासून चळलेल्या माणसांच्या नशीबीं नरकच योग्य असतो बाबा, बाबा, या आपल्या मुलीकडे पाहून तरी हा असला अविचार करूं नका बाबा, अगदींच कशी हो तुम्हांला माया नाहीं ?

**नभाजी**:—या तुझ्या रडण्यानं माझं हृदय द्रवणार नाहीं; माझा निश्चय ढळणार नाहीं. तुला अखेरचं बजावून सांगतो, तुझी खुषी असो अगर नसो, पण लग्न रूपानं तुझं दान मी मानाजीच्या हातीं दिल्यावांचून रहाणार नाहीं.

**जयंती**:—तोच लग्नाचा सोहळा माझ्या मरणाचा सोहळा होईल. ( रागानं निघून जाते नभाजीराव आ पसरून तिच्याकडे एखाद्या पुतळ्या-प्रमाणें पहात उभा रहातो. )

**अंक २ रा समाप्त**

# अंक ३ रा.

## प्रवेश १ ला

**स्थळः**—दौलतरावाचें घर.

( दौलतराव हातांत दागिन्यांचें गाठोडें घेऊन प्रवेश करतो )

**दौलतः**—वहात्या गंगेत हात धुवून घेणं, हेंच खरं मुत्सद्दीपणाचं काम आहे ! देव संधि देतं, पण ती साधून घ्यायला अक्कल असावी. लागते आज आणलेला हा दागिन्यांचा प्रसाद आमच्या घरच्या अंबाबाईला दाखविला, कीं ती प्रसन्न होईल; आणि प्रसन्न झाली नाहीं, तर आज तिची अगदीं गय न करतां या लाथेनें अशी नरम करतों कीं......[ लक्ष्मी हातांत मुसळ घेऊन प्रवेश करते. ]

**लक्ष्मीः**—काय चाललं आहे हें ? असे नाचायला काय लागलांत ?

**दौलतः**—नाहीं. तसं कांहीं नाहीं—मी आपलं-तें—

**लक्ष्मीः**—मी केव्हांपासून वाट पहात आहे इथं.

**दौलतः**—अग, मी पडलों नोकर माणूस ! पण खरंच इतके दिवस आपण गरीब होतों. पण यापुढं-आपण श्रीमंत होणार आहोंत-श्रीमंत !

**लक्ष्मीः**—म्हणजे ?

**दौलतः**—म्हणजे काय. आजपासून या—या गरिबीला दे रजा आणि माझ्या नांवानें मोरे मार—

**लक्ष्मीः**—ओरडत बसूं कीं काय ?

**दौलतः**—तसं नव्हे ग. पण........

**लक्ष्मीः**—जाऊं दे तें, अगोदर थोडं खाऊन, मग काय तें सांगावं !

**दौलतः**—लक्ष्मी, आज तोंड गोड झालं पाहिजे बरं ! हा दौलतराव आजपासून रोज पक्वानं खाणार पक्वानं !

**लक्ष्मी**:--म्हणजे ? कांहींतरी आनंदाची गोष्ट घडलेली दिसते आहे! महाराज आग्र्याहून सुटले का ? केव्हां ? कसे ?

**दौलत**:—महाराज कसचे सुटतात ? ओळख पाहूं काय झालं तें ? पहातों तुझी परीक्षा ?

**लक्ष्मी**:--घातला असेल कुठं दरोडा ! दुसरं काय ?

**दौलत**:—( स्वगत ) आं ! खरं तेंच म्हणाली ! बायको पण बायको ( उघड. ) दरोडे घालायला मी चोर आहे कीं दरोडेखोर आहे ? आं ?

**लक्ष्मी**:—पण त्यांचे सल्लागार तर आहांत ना ?

**दौलत**:—बरं बरं–समजली तुझी अक्कल ! हं....हं....हें पाहिलंस... अं...काय आहे–हें ?

**लक्ष्मी**:—हें काय गौडबंगाल ? कुठून आणलंत हें ! आणि याच्यावर तुम्हीं मला मारणार !

**दौलत**:—हं. हं. तुझं हिचं नांव एक आहे म्हणून तुला मत्सर वाटूं लागला वाटतं ? पण कांहीं अक्कल असूं दे.

**लक्ष्मी**:—मला चांगली अक्कल आहे, पण आपल्याच अकलेचं खोबरं झालं आहे !

**दौलत**:—तुला आतां हा रागाचा सोहाळा सुचूं लागला वाटतं ? पण तुझा हा सोहाळा मी केव्हांच पुरा करणार नाहीं.कारण बायको म्हणजे बायको !

**लक्ष्मी**:—मी बायको आहें तेंच चांगलं आहे. तुम्हांसारखे कुठे दरोडे तरी घालीत नाहीं मी.

**दौलत**:—( स्वगत ) अरेच्चा ! हिची कमान सारखी चढत चालली ! ( उघड ) हं–लक्ष्मी, हा चंद्रहार गळयांत घाल. अग, अशी शोभशील कीं इंद्राची अप्सरा !

**लक्ष्मी**:—हो !– हो तर–! हा इंद्रमहाल ! – आपण इंद्र–आणि मी इंद्राणी ! चांगली शोभून दिसेन नाहीं ? पण हा चंद्रहार कुठून आणला तें मला कळलं आहे !

**दौलत**:—( स्वगत ) आं ! हिला कसं कळलं ? त्या आग्र्याबेताळानं

तर सांगितलं नसेल ना ? मग मात्र माझी धडगत दिसत नाहीं. ह्या या बायकी तुफानानं मी अगदीं बेजार होऊन गेलों आहे. [ उघड ] लक्ष्मी—एक... मानाजीरावांनीं मला एक महत्वाची कामगिरी मोठ्या विश्वासूपणानं सांगितली होती.

**लक्ष्मीः**—आणि ती महत्वाची कामगिरी आपण अगदीं ठीक बजावलीत हो, ही—अशी !

**दौलतः**—लागलीस बोलायला ? अग हंबीररावाच्या वाड्याच्या जप्तीचं काम या हिंमतबहाद्दराकडे होतं.

**लक्ष्मीः**—अगबाई, आज मात्र तुमचा हरामीपणा पुरता दिसून आला. अहो, कांहीं तरी न्याय अन्याय पहायचा होता ?

**दौलतः**—माझ्यासारख्या नोकरानं न्याय अन्याय मुळींच पाहूं नये.

**लक्ष्मीः**—पण खोट्याच्या कपाळीं कुऱ्हाडीचा घाव बसत असतो.

**दौलतः**—इथं मात्र तूं अगदीं सपशेल फसरलीस ! अग देवादिकांनीं सुद्धां चोऱ्या केल्या आहेत. कृष्णानं स्यमंतक मणी चोरला—वस्त्रं चोरलीं—दहीं दूध चोरून खाल्लं आणि महाराजांनीं तर चोऱ्यामाऱ्या करूनच—

**लक्ष्मीः**—खबरदार महाराजांच्या पवित्र नांवाला बट्टा लावाल तर ! महाराज दरोडेखोर नसून, खरे दरोडेखोर तुम्हीं आहांत ! त्यांच्या नांवावर वाटेल तसा जुलूम करून दरोडे घालतां आहांत.

**दौलतः**—आम्हीं दरोडे घालतों !

**लक्ष्मीः**—हो. हो. तुम्हीं घालतां ! हा चंद्रहार चोरून आणलात, हा दरोडा नव्हे तर काय ? पण संभाळा हं—असल्या खोट्या कर्माबद्दल शिक्षा मिळाल्याशिवाय रहात नसते.

**दौलतः**—अग शिक्षा कुणी पाहिली आहे ?

**लक्ष्मीः**—आपल्या अक्कलेचे तारे तुटूं लागले वाटतं ! पण मी आपल्याला सांगून ठेवतें पुढं मागं असल्याच कुठल्यातरी भानगडींत सांपडाल, तेव्हां मात्र संभाळा अं !

**दौलतः**—अग जा—जा—जा. तें पुढें बघूं ! त्याची वाटाघाट आतां कशाला ! काय होणार असेल तें चुकणार नाहीं !

**लक्ष्मी**:—मला हरामाचं नको आहे कांहीं.

**दौलत**:—स्त्रिया एकंदरींत हट्टी खऱ्या ! ऐकायच्या म्हणून नाहींत. ( जाऊं लागतो ).

**लक्ष्मी**:—आणि पुरुष हेकेखोर ! हं कुठं चाललांत ? आणा ते इकडे !

**दौलत**:—धाक घालतेस....या तुझ्या नवऱ्याला धाक घालतेस ?

**लक्ष्मी**:—हो हो. माझा हा धाक आपल्या कल्याणाकरितां आहे.

**दौलत**:—मला असं छळून तुझं चांगलं कल्याण व्हायचं आहे ? बायकोनं नवऱ्याची आज्ञा मानावी असं मी बऱ्याच जणांच्या तोंडून ऐकलं आहे.

**लक्ष्मी**:—दरोडे घालून आणलेले हे दागिने मुकाट्यानं बायकोनं ठेवून घ्यावेत ही चांगली आज्ञा नाहीं का ? ही असली गुंडगोळ करणारी लक्ष्मी एकदां का घरांत शिरली, कीं हिच्या पाठोपाठ हिची धाकटी बहीण अवदसा—आंत शिरलीच म्हणून समजा !

**दौलत**:—तुझ्यासारखी कजाग अवदसा इथं जिवंत वावरत असतांना त्या अवदसेला यायला धीर कसा होणार ?

**लक्ष्मी**:--मी अवदसा ? आणि आपण केवढे साधुपुरुष !

**दौलत**:--माझ्याशीं जित ! या तुझ्या नवऱ्याशीं जित मारतेस ! असा हात दाखवतों कीं—

**लक्ष्मी**:—मग दाखवाच ! पाहूं तर खरं ( पदर कंबरेला खोचूं लागते ) काय व्हायचं असेल तें होऊन जाऊं द्या !

**दौलत**:—( स्वगत ) अवदसेची बला ! बडी आफत येऊन पडली आहे झक् मारली आणि अशी भलतीच गोष्ट काढली !

**लक्ष्मी**:—हं-आतां कां गप्प ? भ्यालांत वाटतं ? असे भिऊं नका. जरा धीर धरा धीर !

**दौलत**:—भ्यालों नाहीं मी प....प....पण....तु....तु....तु....ला दाखवुं म्हणतेस....? पण नको. बायकांवर शस्त्र चालवूं नये अशी शास्त्राची आज्ञा आहेना ? त्या शास्त्राज्ञेनुसार मी तुला माफ करीत आहे !

**लक्ष्मी**:—नुसत्या फुकाफुकी माफी करण्यापेक्षां तुमच्या हातीं काय आहे ?

**दौलत**:—[स्वगत] आतां कसं करावं बुवा ? भिती वाटते हिची ! [उघड] हें बघ लक्ष्मी—तूं अशी रागावूं नकोस. राग येण्याजोगं मी काय बरं बोललों ? प्रेमाच्या प्रसंगांत हे असले रुसण्याफुगण्याचे खेळ चालायचेच ! (लक्ष्मी एकीकडे तोंड फिरवून हंसते.) पुरुष सर्व कांहीं जिंकूं शकतील पण बायकांना जिंकणं मोठं कर्म कठीण आहे. तपश्चर्या करून देवांनासुद्धां प्रसन्न करून घेतां येतं, पण असल्या हट्टी स्त्रियांना प्रसन्न करायला पुरुषांजवळ उपायच नाहीं. ( हात धरतो )

**लक्ष्मी**:—हं. सोडा माझा हात ! मी हट्टी आहे ना ? जाऊं द्या मला !

**दौलत**:—तूं अशी रागावून गेलीस तर हा पसारा आवरायचा कुणी ? पुरुषांनीं मिळवून आणलेल्या कमाईचा बायकांनीं संभाळ करावयाचा असतो.

**लक्ष्मी**:—तें कांहीं नाहीं. मी अशीच मान्यांकडे जाणार ! त्यांना ही सगळी हकीकत सांगणार. मग बघा कसं काय होतं तें !

**दौलत**:—अररर—हें तर डोंगराएवढं लचांड हं...हं लक्ष्मी तूं मानाजीरावांकडे जाऊं नकोस.

**लक्ष्मी**:—कां ? कां जाऊं नकोस ? मी जाणारच—

**दौलत**:—हें पहा, लक्ष्मी, मी तुझ्या पायां पडतों. नांक घासतों, शरण येतों. पण तूं जाऊं नकोस. शरण आलेल्यावर देवसुद्धां दया करीत असतो आणि तूं तर माझी बायको ! मग तूं माझ्यावर अवश्य दया केली पाहिजेस.

**लक्ष्मी**:—ऊं....हूं. मी मुळींच ऐकायची नाहीं.

**दौलत**:—अग नवऱ्याची बेअब्रू करून तुझा मान मोठाच वाढेल की नाहीं ?

**लक्ष्मी**:—तुमच्यासारख्या नवरोजींना ताळ्यावर आणायला असाच उपाय योजावा लागतो.

**दौलत**:—बाई, ठीक आहे तुझा उपाय ! मानाजीरावांकडे गेलीस तर ते दागिने घेतीलच पण वर आणखी माझी कणिक तिंबून काढतील ! हें पहा तुझे पाय धरतों पण तूं तिकडे जाऊं नकोस ( स्वगत ) करतां काय ? अडला नवरा बायकोचे पाय धरी ! ( पाय धरतो. )

लक्ष्मीः—पुन्हां असं कांहीं चोरून आणणार नाहीं ना ?

दौलतः—नाहीं–नाहीं–

लक्ष्मीः—अगदीं माझी शपथ ?

दौलतः—तुझी शपथ !

लक्ष्मीः—उठा आतां. नाहीं जात बरं मी !

दौलतः—पण खरंच जाणार नाहीं ना ?

लक्ष्मीः—नाहीं. [ उठतो ] आतां असं करा. हे दागिने हंबीररावांना नेऊन द्या.

दौलतः—चांगलं ! म्हणजे त्यांनीं सुद्धां मला चांगलाच लंबे करावा ! तूंच या दागिन्यांचं काय वाटेल तें कर....मी एक अक्षरदेखील विचारणार नाहीं

लक्ष्मीः—बरं तर ( दागिने घेऊन जाते. )

दौलतः—प्रसंग पाहून वागतो तोच खरा शहाणा ! बायको म्हणजे कशी नजरेच्या जरबेंत असली पाहिजे; पण आमच्या या बायकोनं माझ्या भित्रेपणामुळं मलाच जरबेंत ठेवलं आहे ! जाऊं द्या. आज पिंगा घालते आहे पण उद्यां इंगा दाखवितांच........

लक्ष्मीः—[ प्रवेश करून ] कशी–कशी सरळ होईल म्हणतां ?

दौलतः—( गोंधळून जाऊन )नाहीं....नाहीं....मी....मी....आ-आपलं तें

लक्ष्मीः—उगीच वेड्यासारखं बडबडूं नका....चला पाहूं !

दौलतः—तूंच पुढं हो–तूंच माझी वाट दाखविणारी–लक्ष्मी, तूं म्हणजे–

— पद —

**दौलतः— चमकशी शुक्र चांदणी ॥**

**लक्ष्मीः— मधुर भाषणीं ॥ प्रीत पाहुनी ॥ नारी या ॥**
**फसति किती मोहुनी ॥ धृ० ॥**

**दौलतः— ही तुझ्या नयनींची लटक ग ॥ लावि मला चटक ग ॥**

**लक्ष्मीः— नाहीं मी भोळी हो भोळी ॥**
**पेकिलीं असलीं किती बोलणीं ॥ १ ॥**

## प्रवेश २ रा.

[ स्थळः—रस्ता ]

हंबीरः—बाबांना दिलेल्या वचनाचा खरेपणा पहाण्याकरितां मला इथं उभं रहावं लागत आहे. ही पहा स्वारी आलीच. ( नभाजीराव येतो. ) मामासाहेब ( वंदन करतो. )

नभाजीः—कोण हंबीर ? बरा आहेसना ? चिरंजीव हो ! ( स्वगत ) आज हा मुद्दाम कां भेटला ? [ जाऊं लागतो. ]

हंबीरः—थांबा मामासाहेब.

नभाजीः—मामासाहेब हे शब्द पुन्हां उच्चारूं नकोस.

हंबीरः—कां ? लहानपणापासून मी आपल्याला याच नांवानं हांक मारीत आहे.

नभाजीः—लहानपणीं तुझ्या अल्लडपणामुळं तुझ्या बोलण्याला आळा घातला नाहीं, पण आतां तूं चांगला मोठा झाला आहेस; तेव्हां असे शब्द पुन्हां उच्चारूं नकोस.

हंबीरः—मी याच नांवानं आपल्याला हांक मारल्यावांचून रहाणार नाहीं. मामासाहेब, जयंतीचं माझ्यावर प्रेम असून ती माझ्याशीं लग्न करायला तयार आहे.

नभाजीः—मालाचा मालक मी आहें. देणारा जर राजी नसेल तर घेणारा घेईल काय ?

हंबीरः—पण मरणसमयीं माझ्या बाबांना तुम्हीं वचन दिलं आहांत ना ?

नभाजीः—[स्वगत] वचनसुद्धां विसरला नाहीं बेटा ! (उघड) त्यावेळीं वरकांती मोठेपणा दाखविण्याकरितां मी तसं वचन दिलं होतं, पण....

हंबीरः—आपलं वचन पुरं करायला मी तयार आहे.

नभाजीः—पण मी कुठं तयार आहे ? असलं बोलणं बोलायला लाजेची कांहीं मर्यादा !

हंबीरः—लाजेची मर्यादा मी ओलांडीत नसून, तुम्हीं मात्र स्वतःच्या अन्नचं दिवाळं म्हातारपणीं काढायला तयार झालां आहांत.

नभाजी:--फार...फार बोलूं लागलास तूं. म्हातारपणीं माझी लाज काढतोस !

हंबीर.--पैशाच्या आमिषाला बळी पडून तुम्हीं बेइमान झालां आहांत.

नभाजी:—मी बेइमान !

हंबीर:—हो. तुम्हीं बेइमान. दिलेल्या वचनाचं जो इमान बाळगीत नाहीं, तो बेइमान नव्हे तर कोण ? मामासाहेब, मला काय तो निकाल सांगा.

नभाजी:—तुला जयंती मिळणार नाहीं, हाच माझा निकाल! मी मानाजी-रावांना तिच्याबद्दल वचन दिलं आहे, आणि तें मला पाळलच पाहिजे.

हंबीर:--एका ठिकाणीं एकदां वचन दिलं असतां त्याचेबद्दल पुन्हां दुसऱ्या ठिकाणीं वचन देणं, विश्वासघातकीपणाचं आहे. आणि आपण जें मानाजीरावांना वचन दिलं आहे तें निव्वळ पैशाकरितां आहे.

नभाजी:--बरं पैशाकरितां आहे. त्याची पंचाईत तुला कशाला !

हंबीर:—माझं लग्न जयंतीबरोबरच होणार आहे. आणि माझ्याशिवाय दुसऱ्या कुणाशींही लग्न करायला तयार होणार नाहीं, असा तिचा दृढनिश्चय आहे.

नभाजी:--काय वाटेल त्या तऱ्हेनं तिचं मन वळवून तिला मानाजी-रावांबरोबर लग्न लावायला भाग पाडीन, तरच नांवाचा नभाजीराव. (जातो)

हंबीर:--अरेरे ! बेइमानीपणाचा कळस झाला! या द्रव्यलालसेनं कुणाचं चागलं झालं आहे.

---

## प्रवेश २ रा

स्थळ:--मानाजीचा वाडा.

मानाजी:--काय म्हणतोस दौलत ? तो हरामखोर हंबीर तुला पहातांच पळून गेला ?

दौलत:—हो ! हो ! भिऊन पळून गेला.

मानाजी:--प्रसंग पडल्यास तूं त्याच्याशीं दोन हात करशील कीं नाहीं ?

दौलत:--छे....छे. तें नाहीं आपल्याला जमायचं !

मानाजी:--असं भेदरल्यासारखं काय करतोस तू? आतांच बोललास ना कीं तो तुला भ्याला म्हणून !

दौलत: --खरं सांगूं ! तो कांहीं मला भ्याला नाहीं. मीच त्याला भ्यालों. शिपाई बरोबर होते म्हणून धीर धरून उभा होतों, आणि शिपाई जर तिथं नसते तर माझी छाती नव्हती त्याच्यासमोर उभा रहाण्याची. अवसान धरून तलवार उपसली तोंच पगडी पडली. सुरवातीलाच अपशकुन झाला. मग लढाई जिंकणार कशी ?

( नभाजीराव गडबडीनें प्रवेश करतात )

नभाजी:--मानाजीराव....महाराज आग्र्याहून फरारी झाले म्हणतात !

मानाजी:—अशक्य. अगदीं अशक्य गोष्ट आहे. तुम्हाला कुणीतरी ही बात झोंकून दिली असेल झालं. सध्यांच्या वातावरणांत असल्या बाजारगप्पा बराच सांवळागोंधळ माजवीत असतात. त्यांतलीच ही एक....कां दौलत ?

दौलत:--खरं आहे सरकार (स्वगत) बातच ठरली म्हणजे पुरे. नाहींतर आमची सरदारी....ऊं हूं....!

नभाजी:—पण समजा, महाराज आग्र्याहून खरंच फरारी झाले असले, तर त्यांना दक्षिणेंत यायला मुळींच वेळ लागणार नाहीं.

मानाजी:—जाऊं द्या ही कटकट ! महाराज सुटत नाहींत नी कांहीं नाहीं. पण जयंती संबंधानं काय झालं ? बहुतेक रुकार पडलाच असेल: कारण बापाचा पेंच पडला !

नभाजी:—सांगायला थोडं वाईट वाटतं....

मानाजी:—अखेर कबूल झाली कीं नाहीं ती ?

नभाजी: नाहीं हो. आपली मागणी तिनं नाकारली आहे.

मानाजी:--काय नाकारली !

नभाजी:—हो. त्या पाजी हंबीरानं तिला फितवून ठेवलं आहे. त्याच्या प्रेमाच्या जादूनं ती भारून गेली आहे. त्यामुळं ती होकार देत नाहीं.

मानाजी:—हंबीर, जिथंतिथं माझ्या सुखाच्या आड हा हंबीर ! नभाजी-राव, तुम्ही इतके नेभळे असाल, अशी माझी कल्पना नव्हती. तुमची मुलगी

तुमचं ऐकत नाहीं म्हणजे काय गोष्ट आहे. मुलीच्या बोलण्याला भीक घालणारा बाप मी आजच पाहिला. जा, तिची नीट समजूत घालून कबूली मिळवा.

**नभाजीः**—त्या हंबीराचा योग्य तो बंदोबस्त केल्याशिवाय तिची कबूली मिळणं शक्य नाहीं.

**मानाजी:**—या बदमाष हंबीराचा कांटा काढल्याखेरीज माझाही कार्यभाग साधायचा नाहीं. हरामखोराचं घर जप्त केल्यापासून, खेडयापाडयांत जाऊन लोकांना चिथावणी देऊन त्यानं मोठ्या संकटाचा प्रश्न आणून ठेवला आहे. दौलत, भरपूर शिपाई घेऊन, या नभाजीरावांबरोबर जाऊन, जिथं मिळेल तिथून पकडून आण त्या हरामखोराला.

**दौलतः**—( घाबरून जाऊन ) पण सरकार....

**मानाजीः**—अहां-हां. तूं हो पुढं. मी आलोंच मागोमाग.

( दौलतराव-नभाजीराव जातात. )

**मानाजीः**—विश्वाघातक्या नभाजी ! या मानाजीला तूं अजून पुरतं ओळखलं नाहींस. जयंती एकदा माझ्या हातीं येऊं दे, मग माझी खरी करामत तुला दिसून येईल. प्रत्यक्ष पोटच्या पोरीची मान जो पैशांकरितां चिरायला तयार झाला, तो पुढंमागं माझीही मान चिरणार नाहीं याचा विश्वास कुणी धरावा ?

## प्रवेश ४ था

### संध्यासमय.

**स्थळः**—नभाजीच्या वाडयांतील बाग.

**प्रतापः**—ताई ! तूं कुणाची वाट पहात आहेस ?

**जयंतीः**—जसं कांहीं तुला ठाऊकच नाहीं.

**प्रतापः**—पण यावेळीं आठवत नसेल तर ? माहिती असलेल्या माणसानं सांगायला नको का ?

**जयंतीः**—बा-तूं तर फारच बोलूं लागलास !

**प्रताप**:--हा सगळा तुझ्याच शिक्षणाचा प्रताप !

**जयंती**:--असं, बरं प्रताप, बाबांच्या मनांतून मी मानाजीरावांशी लग्न करावं असं आहे आणि त्याबद्दल ते त्यांच्याकडून बराच पैसा घेणार आहेत.

**प्रताप**:—तुझं लग्न त्या मानाजींशीं ? माझी सोन्यासारखी ताई त्यांची नको बायको व्हायला. मी बाबांना चक्क सांगतों कीं, तुम्ही पैसाही घेऊं नका, आणि ताईचं लग्न मानाजींशीं लावूंही नका. बाबा कदाचित रागावेल तर मी तुझं रक्षण करीन. भावानं जर बहिणीचं रक्षण करायचं नाहीं तर कुणी करायचं ?

**जयंती**:--बाबा जुलमानं माझं लग्न लावयाला तयार झाले तर ?

**प्रताप**:--तर बाबांबरोबर भांडायला मी कमी करणार नाहीं.

**जयंती**:--नुसती बढाई मारल्यानं काय होणार ?

**प्रताप**:--माझ्याविषयीं तुला संशय येतो ? ताई, माझ्या अंगांत मराठ्याचं मर्दानी रक्त खेळत आहे. सांग, या तलवारीनं माझं डोकं उडव ! नुसता तुझ्या हुकमाचा अवकाश आहे. तुझा भाऊ म्हणजे नाजूक नार नाहीं.

**जयंती**:--तुझ्या या बोलण्यानं तुझा बाणेदारपणा दिसून आला. निराशेच्या जागीं आशा खेळूं लागली. माझं जर बरंवाईट झालं, तर त्यांचा सूड तूं घेतल्यावांचून राहूं नकोस.

**प्रताप**:--माझ्या जीवांत जीव असेपर्यंत तुझ्याबद्दलचा सूड उगवल्याशिवाय मी कधींहि राहाणार नाहीं ( हंबीरराव येतो. )

**हंबीर**:—वाः प्रताप ! यावेळचा तुझा हा उत्साह, हा बाणेदारपणा पाहून मला आनंदाचं भरतं येत आहे. तुम्हांसारख्या बालवीरांत संचारलेलं हें चैतन्य देशाच्या उर्जितावस्थेचं पूर्व चिन्ह होय !

**प्रताप**:--अबबब ! एवढ्या मोठ्या स्तुतीला मी मुळींच पात्र नाहीं. ताई, जातों हं.

**जयंती**:—थांब ना जरा.

**प्रताप**:—छट्, आतां तर मुळींच थांबायचा नाहीं. हं ताई ! [जातो.]

**जयंती**:--महाराज, माझ्या आमंत्रणावरून लगेच आलांत हें माझं भाग्य म्हणायचं.

हंबीर:—प्रेमीजीवाची प्रेमाशा—प्रेमानं पुनित झालेला जीव कसा बरं झिडकारील ! पण तूं मला कशाकरितां बोलावलंस ?

जयंती:—मी....मी....कशा...करितां....(अडखळते.)

हंबीर:—जिव्हाळ्याच्या मनुष्याच्या येण्यानं प्रेमीजीवांना प्रेमाचं भरतं येतं आणि वाचेला मुग्धावस्था येते.—

— पद —

**या प्रीतिच्या भावना ॥ सर्वांगीं सुमनें येती ॥**
**भाव मनींचे नयनीं चमकती ॥ कांपित कांति ॥ धृ ॥**
**जो रंग प्रेम जगतीं ॥ भोगि सौख्य शांति ॥ आनंदा ॥१॥**

जयंती, मी तुझ्यासंबंधाने नभाजीरावांजवळ गोष्ट काढली पण त्यांनीं नकार दर्शवून वचन दिल्याचंसुद्धां नाकबूल केलं.

जयंती:—मानाजीनं पैशाच्या जादूनं त्यांना अगदीं पूरेपूर भारून टाकलं आहे. मानाजीच्या मायावी बोलण्याला ते फसले आहेत.

हंबीर:—मला वाटतं त्यांचे कांहींतरी निराळेच बेत चालले असले पाहिजेत. त्यांना ताळ्यावर यायला एकच उपाय—तो म्हणजे शिवाजीमहाराजांची सुटका.

जयंती:—ते तर तुरुंगांतून फरारी झाले असं मी ऐकलं आहे आणि तें विचारण्याकरितां मुद्दाम आपल्याला बोलावलं आहे.

हंबीर:—हो खरं आहे. अशी दाट वदंता उठली आहे खरी ? आणि बहुतकरून ती खरी असावी !

जयंती:—आपली वाणी सत्य होवो. सुदैवानं जर ही बातमी खरी ठरली, तर महाराष्ट्राच्या दुर्दैवाचे दिवस संपले आणि स्वतंत्रतेचा मंगलकाळ जवळ आला (लांबून....कोकीळ....कूहू....कूहू....कूहू....कू....कूकूकू असा टहूकार फोडते)

हंबीर:—ऐक, जयंती ऐक, ही कोकिळासुद्धां तुझ्या बोलण्याला साथ देत आहे.

जयंती:—आणि हा वारासुद्धां आपल्या हळूवार झुळकेनं तेंच गुणगुणत




हंबीरराव:—ती पाहिलीस कां संध्या–सुंदरी

नाहीं का ? हे वृक्ष आनंदानं आपल्या माना डोलावून तेंच भासवित नाहींत का ! महाराज, आज सारा निसर्ग आनंदानं नाचूं लागला आहे.

— पद —

हांसत नाचत सृष्टी ही डोले मंगला ॥
प्रेमें आलिंगिती या लता तरुला ॥ धृ० ॥
भ्रमर गुंजती सुस्वर गाना ॥ कोकिळा घे पंचम ताना ॥
सुखवीत नयना दृश्य जीवाला ॥ १ ॥

**हंबीरः**--जयंती, ती पाहिलीस का ! ती संध्यासुंदरी आपल्या पतिला--त्या दिनकराला भेटायला किती आतुर झाली आहे ती !

**जयंतीः**- हो—! जशी कांहीं नवी नवरीच !

**हंबीरः**—कोण ? ती–कीं–तूं–?

**जयंतीः**—( लाजून ) कोण मी ? उगीचच बाई !

**हंबीरः**—उगीच बाई ! तिकडे लाजेनं चूर होऊन त्या संध्यासुंदरीचे गाल लाल झाले आहेत, तर इकडे तुझ्यासुद्धां गालांवर गुलाब फुलले आहेत !

**जयंतीः**—हो तर—

**हंबीरः**—चंचल नेत्रांतल्या नाजुक जादूनं ती त्याची नजरबंदी करीत आहे, तर तूं आपल्या या नेत्रांतल्या अजब जादूनं मला मोहिनी घालति आहेस!

**जयंतीः**—तर—तर—

**हंबीरः**--ती प्रियकराच्या अलिंगनाकरितां तन्मय होऊन देहाचंसुद्धां भान विसरून गेली आहे, आणि इकडे तूं सुद्धां प्रेमाच्या तंद्रींत गुंग होऊन बाह्य जगाला विसरून गेली आहेस.

**जयंतीः**--आणि या शुभमंगलकालीं, अत्यानंदानं चाललेला हा पक्ष्यांचा मंजुळ ध्वनी आपल्या लग्नांतील मंत्रोच्चारच साजेल नाहीं ?

**हंबीरः**—वा ! किती सुंदर ! किती रम्य ! किती नयनमनोहर दृश्य हें !

**जयंतीः**—तें पाहिलंत का ? तिचा नाथ तिच्या अगदीं जवळ गेला–आणि..

**हंबीरः**—तिला बाहुपाशांत घेऊन--( दोघेही आलिंगन देतात. ) जयंती.

**जयंतीः**—नाथ !

**हंबीरः**—आनंदाचं अंतिम सौख्य म्हणतात तें हेंच असेल का ?

( पडद्यांत नभाजीराव मोठ्यानं 'चोर' ! 'चोर' !! असं ओरडतात. )

**जयंतीः**—अगबाई ! हा तर बाबांचा आवाज ! घरांत कुणी चोर शिरला कीं काय ? महाराज, जरा थांबा हं ! ( जाते. )

**हंबीरः**—हा काय घोटाळा ? दिवसाढवळ्या चोरी करणारा हा चोर अट्टल वस्ताद असला पाहिजे. असल्या धाडसी चोराला चांगली शिक्षा ठोठावली पाहिजे. ( जाऊं लागतो, तों त्याच बाजूनें नभाजीराव प्रवेश करतात. व दुसऱ्याबाजूनें दौलत शिपायांसह प्रवेश करतो. )

**नभाजीः**—शिपायांनो, चला पकडा या चोराला.

**दौलतः**—चोर, चोर, खरंच चोर आहे हा !

**हंबीरः**—हं खबरदार ! कुणाचं कांय चोरलं मी ?

**नभाजीः**—बर आणखी बोलून कांगावा करूं पहातोस ? बोल, तुला इथं यायचं कारण काय ?

**हंबीरः**—नेहमींप्रमाणं जयंतीच्या भेटीकरितां आलों होतों.

**नभाजीः**—माझ्या मुलीचं मन फितवून, तिला पळवून न्यायचा तुझा बेत होता नाहीं ? चला, शिपाई ! पकडा याला ! ( शिपाई पकडायला पुढें होतात. )

**हंबीरः**—थांबा ! तुमच्या जीवाची जर तुम्हाला पर्वा नसेल तर मला पकडायला पुढं याल ? ( तलवार उपसतो शिपाई मागें होऊं लागतात. )

**दौलतः**—हं शिपायांनो, भिव्याप्रमाणं असे मागें जाऊं नका. पहाता काय याच्या तोंडाकडे ? चला कैद करा या चोरट्या प्रेमवीराला !

**हंबीरः**—खबरदार जाग्यावरून हाललांत तर ? एकेकाला छाटून टाकीन.

**मानाजीः**—( प्रवेश करून ) छाटून टाकीन ? कुणाची छाती आहे यांना छाटून टाकण्याची ? हरामखोरा, या गरीब शिपायांना भिती दाखवितोस ? शिपाई, नभाजीराव, दौलत, चला, करा हल्ला एकदम.

[ मानाजी, नभाजी, दौलत, आणि शिपाई हंबीररावाला चोहोंबाजूनें वेढून टाकतात, त्या सर्वांबरोबर हंबीरराव बेडर हिंमतीनें लढूं लागतो. नंतर कांहीं

वेळानें हंबीररावाची तलवार हातांतून निसटते. शिपाई ताबडतोब त्याला कैद करतात व हातापायांत साखळदंड अडकवितात. ]

**मानाजी**:--कां नभाजीराव, कसा चोर सांपडला ?

**हंबीर**:--चूप बदमाष! खरा चोर तूं आहेस. यावेळीं जर माझ्या तरवारीनं दगा दिला नसता तर जीवांत जीव असेपर्यंत मी तुमच्याशीं लढत राहिलों असतों.

**मानाजी**:--( वेडावून ) तलवार असती तर लढलों असतों अं !

**हंबीर**:--मानाजी, मला असं दगलबाजीनं पकडून--

**मानाजी**:--तुला दगलबाजीनं पकडलं नसून राजरोस गुन्हां करतांना पकडलं आहे. या नभाजीरावांसारख्या घरंदाज मराठयांच्या घरांत शिरून तूं त्यांची बेइज्जत करीत होतास. त्यांच्या मुलीशीं फंदफितुरी चालविली होतीस तूं ! नभाजीरावांनीं माझ्याकडे फिर्याद दिली-दाद मागितली. आणि माझं काम न्याय करण्याचं असल्यामुळं, तुला पकडणं भाग पडलं. गुन्हा करतांना कसा अगदीं अचूक सांपडलास नाहीं ? ( हंसतो ).

**हंबीर**:--काय करूं रे, माझे हात मोकळे असते-तर असले जहरी शब्द उच्चारणाऱ्या जिव्हेचे तुकडे तुकडे करून टाकले असते.

**दौलत**:--शिपायांनों, चांगलं ! चांगलं-घट्ट धरून ठेवा ! नाहींतर सुटून जायचा आणि भलताच प्रसंग यायचा !

**मानाजी**:--नभाजीराव, मी म्हणतो तें खरं कीं नाहीं ?

**नभाजी**:--हो हो तर...चोर तो चोर आणि पुन्हां शिरजोर !

**हंबीर**:--नभाजीराव, आपल्या पिकलेल्या केसांकडे पाहून तरी खरं बोला!

**नभाजी**:--मला अक्कल शिकवितोस ? मला माझ्या पांढऱ्या केंसांची आठवण करून देतोस ? अलिकडे काय पोरं शेफारली आहेत पहा, चोरी करून-वर आणखी ब्रह्मज्ञानाच्या गोष्टी सांगायला तयार !

**दौलत**:--कां ? गप्प का ? आतां का जिभेच्या नाडया आंखडल्या ? सरकार, सरळ तुरुंगांत रवानगी !

**मानाजी**:--तें तूं नको सांगायला ! चला रे घेऊन.

[ शिपाई हंबीररावाला नेऊं लागतात, तो जयंती येते व हें दृश्य पाहून आश्चर्यचकित होते. ]

**जयंतीः**—हें काय !

**मानाजीः**—काय आहे तें डोळ्यांनीं पहाते आहेस !

**जयंतीः**—बाबा, कशाकरितां पकडलंत यांना ?

**मानाजीः**—तुमच्या घरीं चोरी करतांना.

**जयंतीः**—खोटी गोष्ट ! मानाजीराव, तुमचा सर्व बेत मला समजून आला. चोरी करायला हे आले नसून तुम्ही मात्र इथं चोरी करायला आलां आहांत !

**मानाजीः**—जयंती, तोंड आटप !

**जयंतीः**—प्रत्यक्ष डोळ्यापुढं अन्याय घडत असतांना गप्प राहूं ? या एकटया वीरांना-तुम्ही इतक्या लोकांनीं पकडलंत ? वाहवारे मर्द पुरुष !

**मानाजीः**—जयंती, पुन्हां सांगतों मुकाटयानं तोंड आटप. नभाजीराव, या तुमच्या बेमुर्वत पोरीला आपली जीभ आंवरून धरायला सांगा, नाहींतर मला कायदाभंग करावा लागेल.

**जयंतीः**—अजून कुठले कायदेभंग व्हायचे बाकी राहिले आहेत ? बाबा, तुम्हांला बाप म्हणणं देखील शोभत नाहीं. आपल्या दुष्टपणाची मजल इथपर्यंत गेली ना ! मानाजीराव, माझ्याकरितां यांना कां उगीच छळतां ! यांच्या-करितां मी आपल्याजवळ पदर पसरतें, भीक मागतें.

**हंबीरः**—जयंती, भिक्षेची याचना करूं नकोस. खऱ्या वीराला मरण पत्करतं पण भीक मागणं पत्करत नाहीं.

**जयंतीः**—पण महाराज, आपल्या जिवाचं कांहीं बरं वाईट झालं तर ? मानाजीराव, माझ्याकडे पाहून तरी यांना सोडा हो.

**मानाजीः**—सोडीन-पण एका अटीवर.

**जयंतीः**—सांगा, यांच्याकरितां मी काय वाटेल तें करायला तयार आहे !

**मानाजीः**—माझ्याशीं तुला लग्न लावावं लागेल.

**जयंतीः**—ही तुमची अट कधींही पुरी होणं शक्य नाहीं.

**मानाजीः**—मग याची सुटकाही होणं शक्य नाहीं. तुझा जबाब येईपर्यंत याला तुरुंगांत ठेवीन आणि नंतर हाल हाल करून नरकांत पाठवून देईन.

**जयंतीः**—तो नरकदेखील तुमच्याचकरितां आहे. महाराज, आपण

आपलं धैर्य सोडूं नका. माझं प्रेम हिमाचलाप्रमाणं अचल आहे. आपल्याला कैदखान्यांत जर मरण आलं, तर आपल्या पाठोपाठ ही जयंती-दिव्य प्रेमाची सोबत घेऊन, आपल्या भेटीला आल्याखेरीज रहाणार नाहीं.

**हंबीरः**—जयंती, मी तर जातोंच पण तू महाराजांचं पवित्र कार्य लक्षांत आणून या तुझ्या वाडिलांचे डोळे उघड.

**मानाजीः**—महाराजांचं पवित्र कार्य...ऊं...पाजी, लुटारू, दरोडेखोर तो......

**हंबीरः**—खबरदार महाराजांविषयीं कांहीं कमी जास्त बोललास तर या जंजीरानं तुझं डोंकंच फोडून टाकीन. नभाजीराव, या हरामखोराच्या खोटया भाषणाला भुलून तुम्ही फसलां आहांत, पण याचं कार्य होतांच हा दुतोंडी साप तुम्हांला विषारी दंश केल्यावांचून रहाणार नाहीं.

**नभाजीः**—बरं, बरं. करूं दे मला दंश ! माझं मी चांगलं पाहून घेईन. मोठा आला आहे पांडित्याच्या गोष्टी शिकवायला !

**मानाजीः**—शिपाई, घेऊन चला याला. [ हंबीररावांना नेऊं लागतात, तोंच तलवार हातीं घेऊन प्रताप प्रवेश करतो.

**प्रतापः**—थांबा. कुठं घेऊन चाललांत यांना ? अगोदर माझ्या प्रश्नाला जबाब द्या ! नाहींपेक्षां या माझ्या तलवारीशीं गांठ आहे.

**मानाजीः**—कां पोरकटराव ! फारशी ऐट आणली आहे तुम्ही ! नभाजीराव, फार चेकाळलं आहे पोर ! करा गप्प त्याला !

**नभाजीः**—प्रताप, मुकाट्यानं गप्प बसतोस कीं नाहीं ?

**प्रतापः**—बसत नाहीं. काय करायचं असेल तें करून घ्या.

**नभाजीः**—कारट्या—मला उलट जबाब देतोस !

**प्रतापः**—कर्तव्यापासून चळलेल्या बेइमान बापाला उलट जबाब द्यायला हरकत नसते.

**नभाजीः**—थांब. तुला आतां चांगलाच मार देतों.

**प्रतापः**—हं थांबा—जागचे जागीं उभे रहा. नात्यानं बाप असाल, पण न्यायाच्या कामांत मी बापबीप ओळखीत नाहीं.

**दौलतः**—पाणी अगदीं जलाल मुरतं आहे ! मारुतीचा दुसरा अवतार दिसतोय !

**नभाजीः**—आतां काय करावं ? मुलगी फिरली, मुलगा फिरला—

**हंबीरः**—आणि स्वतः तुम्हीही फिरला आहांत !

**प्रतापः**—बोला माझ्या प्रश्नाला जबाब द्या.

**जयंतीः**—शाबास बाळ. आतां मात्र तूं या जयंतीचा भाऊ शोभतोस खरा !

**हंबीरः**—नभाजीराव, तुम्ही तुमचा इमानीपणा सोडलात पण तो तुमच्या मुलानं राखला !

**नभाजीः**—काय करूं रे. या पोरानं हृदयावर डाग दिला.

**प्रतापः**—बोला ? मला जबाब देता कीं नाहीं ?

**मानाजीः**—ए पोरट्या, बऱ्या बोलानं बाजूला होतोस कीं नाहीं ?

**प्रतापः**—होत नाहीं. तुझा काय मगदूर असेल तो खर्च करून घे !

**मानाजीः**—दौलत, पकड या पोराला, आणि दे ठेवून दोन थोबाडांत.

**दौलतः**—मला नाहीं धीर होत ! भिती वाटते आपल्याला. तुम्हीच काय तें करा !

**मानाजीः**—वारे शूर शिपाई !

[ मानाजी प्रतापाला पकडायला जातो. प्रताप तलवार सरसावून लढायला तयार होतो. तें पाहून मानाजी आपल्या तलवारीनें त्याच्याशीं सामना देतो. दोघांची लढाई जुंपते, पण थोड्या वेळानंतर प्रतापाची तलवार हातांतून गळून पडते, तोंच मानाजी तलवार त्याच्या छातीवर रोखून धरतो. प्रताप जोर करून पुढं येण्याचा प्रयत्न करतो. तें पाहून जयंती त्याच्या पाठीमागें जाऊन त्याला सांवरून धरण्याचा प्रयत्न करते. हंबीरराव धडपड करून पुढं येण्याची पराकाष्ठा करतो, पण शिपाई त्याला जोरानं मागं खेचूं लागतात. मानाजीराव रागांत. नभाजीराव आनंदांत, जयंती भयभीत तर—दौलत हंसत असतांना पडदा पडतो.]

**अंक तिसरा समाप्त.**

# अंक ४ था.

## प्रवेश १ ला

स्थळः—छावणी

**हिरोजीः**--शिवाजीमहाराजांनीं पिढ्यान पिढ्या गुलामगिरींत पडलेल्या या देशाला स्वतंत्र करण्याचं महत्कार्य आरंभलं. त्या कार्यात त्यांना अनेक संकटं येत आहेत, पण त्यांची पर्वा न बाळगतां—ते आपलं कर्तव्य पूर्ण तत्परतेनं बजावीत आहेत. स्वराज्याची आशा त्यांनींच लोकांना लावून दिली आणि त्यांना ती पटल्यामुळं सर्वजण त्यांच्या कृत्यांना पाठिंबा देत आहेत. देशाच्या कल्याणाकरितां मोठ्या विश्वासानं ते औरंगजेबाच्या भेटीला गेले तर त्यानं विश्वासघात करून यांना कैदेंत टाकलं. कपटानं वागणाऱ्या मनुष्याबरोबर जर कपटानंच वागलं तर त्यांत पाप लागत नसतं. ठगाला ठग भेटल्यानं युक्तीचा खेळ होऊन अक्कलवंताच्या अक्कलेचं सार्थक होत असतं. ( तानाजी येतो )

**तानाजीः**--लोकोत्तर पुरुषाच्या सेवाचाकरींत देह झिजविल्यानंच आयुष्याचं सार्थक होत असतं.

**हिरोजीः**—खरंच तानाजी, महाराजांच्या अंगीं दैवी अंश नाहीं असं म्हणण्याचा दुराग्रह, स्वार्थी आणि द्वेषानं अंध झालेल्या लोकांवांचून कोण बरं करील ? आणि असल्या दैवी पुरुषांचे प्रयत्न केव्हांही निष्फळ होत नसतात.

**तानाजीः**--या दैवी पुरुषानं आरंभिलेल्या पवित्र अशा राष्ट्रकार्याकरितां मी माझे प्राण अर्पण करावे अशी माझी इच्छा आहे. तो मंगलकाळ, ती भाग्याची मोहीम, ज्यावेळीं माझ्या वाट्याला येईल, त्यावेळीं हा तानाजी स्वतःला भाग्यवान समजेल.

**हिरोजीः**--तानाजी, आपल्या दिलाच्या सच्च्या बोलांनीं या हिरोजीचं हृदय तू थरारून सोडलंस. उज्वल राजनिष्ठेची पराकाष्ठा केलीस.

( पडद्यांत ' जय शिवाजी महाराज ' असा त्रिवार जयघोष होतो. )

तानाजी, आनंदानं फुललेली—आणि उत्साहानं नटलेली ही महाराष्ट्र जनता पहा, केवढ्या आतुरतेनं महाराजांचं दर्शन घेण्याकरितां धडपडत आहे ती !

**तानाजीः**—त्या पहा मा भगिनी किती भाविकतेनं त्यांना ओवाळीत आहेत त्या. कांहींजणी तर पंचारती करीत आहेत. एकीनं तर त्यांच्या भाग्यवान कपाळीं तिलकच लावला. त्यांचं दर्शन घेण्याकरितां लोकांची रिघचरिघ लागली आहे. धन्य, धन्य महाराष्ट्रा ! तूं धन्य आहेस ! तुझं नशीब थोर म्हणून असला पुण्यवान पुरुष—असला, अलौकिक महात्मा तुझ्या उदरीं जन्माला आला.

**हिरोजीः**—अहाहा ! हें अवर्णनीय दृश्य पाहून माझं भान हरपलं, डोळे पावन झाले, ते पहा महाराज इकडेच येत आहेत. कर, या अवतारी पुरुषाला –लोकांच्या राजाला, महाराष्ट्राच्या महादेवाला वंदन कर !

[ दोघेही वंदन करूं लागतात शिवाजी महाराज प्रवेश करतात. ]

**शिवाजीः**—धन्य महाराष्ट्र कीं त्याला असले एकनिष्ठ लोक लाभले आहेत.

**हिरोजीः**—छे छे महाराज, आम्हीं आपले बंदे गुलाम आहोंत.

**शिवाजीः**—गुलाम ! कोण कुणाचा गुलाम ? मनुष्य आपल्या साडेतीन हात देहाचा आणि कर्तव्याचा गुलाम असतांना, तो दुसऱ्याचा गुलाम झाला पाहिजे असा ईश्वरी नियम तर नाहीं ना ?

**हिरोजीः**—मग हे कांहीं राजे, दुसऱ्यांना गुलाम बनविण्याकरितां लोकांना कां छळतात ? जुलूम, जबरदस्तीनं बाटवून त्यांचं स्वातंत्र्यसुख कां हिरावून घेतात ?

**शिवाजीः**—हे असले राजे, खरे राजे नसून निव्वळ धर्म द्वेष्टे सैतान असले पाहिजेत. असल्या अन्यायी राजांचा ईश्वरीअंश नष्ट झाला असला पाहिजे त्यांच्या दैवी गुणांना दुर्गुणांची कीड लागली असली पाहिजे जगांतले असले हे राजे निव्वळ सैतान होत, आणि त्यांचं राज्य म्हणजे राक्षसी राज्य होय. जे राजे स्वतःच्या सुखसोयीसाठीं, आपल्या ख्यालीखुशालीसाठीं धर्माज्ञेचे नियम तोडूं शकतात, ते राजे कसले ? पण तानाजी, तुझ्या कामाचं काय झालं ?

**तानाजीः**—आपल्या तुरुंगवासाचा फायदा घेऊन बोरगांवचे ते माने—

**शिवाजी**:--म्हणजे कोण मानाजीराव ?

**तानाजी**:—होय महाराज. आपल्या नियमांना झुगारून देऊन त्यानं बेबंदशाही माजविली आहे--अत्याचार चालविला आहे.

**शिवाजी**:—अधिकार मदानं क्षुद्र मनाचा मनुष्य आपलं कर्तव्य विसरून जात असतो. योग्य तो पुरावा मिळवून या सगळ्या कृत्यांचा निवाडा हा केलाच पाहिजे. शिवाजीच्या राज्यांत असल्या बेजबाबदार अधिकाऱ्यांना न्यायी शासन मिळत असतं असं मला साऱ्या जगाला दाखवायचं आहे, आणि न्यायाच्या कामांत विलंब बिलकूल उपयोगाचा नाहीं.

**तानाजी**:--पण मानाजीराव इतकंच करून थांबले नाहींत तर आपल्या कृत्यांना प्रतिकार करणाऱ्या हंबीरराव मोहित्यांनासुद्धा कैदेंत टाकलं आहे त्यांनीं.

**शिवाजी**:--हंबीरराव कैदेंत आहेत ?

**तानाजी**:--होय महाराज. ते नभाजीराव त्यांना सामील असून, पैशाकरितां आपली मुलगी मानाजीरावांना द्यायला तयार झाले आहेत.

**शिवाजी**:--खरं सांगतोस तानाजी तूं हें ? मला नाहीं खरं वाटत.

**तानाजी**: - अगदीं शब्द न् शब्द खरा आहे. मी खुद्द जातीनं जाऊन ही सारी माहिती गोळा केली आहे.

**शिवाजी**:—हा नभाजी म्हातारपणीं दगलबाजी करायला तयार झाला ? माझ्यासमोर घेतलेलं वचन विसरला ? हंबीररावांच्या वडिलांना त्यांनीं मरणकाळीं वचन दिलं होतं आणि... मीसुद्धा त्यांना वचन दिलं आहे. तें....तें मला पाळलंच पाहिजे. आकाशाच्या फटींतून, अधिऱ्यामनानं, आणि आशाळभूत नजरेनं ते माझ्याकडे पहात आहेत. स्वर्गस्थ वीरपुरुषा, मी तुला वंदन करतों. नभाजी बेइमान झाला पण हा शिवाजी कधींही बेइमान होणार नाहीं. तानाजी, आपण स्वतः जाऊन या सगळ्या प्रकरणाची नीट चौकशी करूं या.

**हिरोजी**:—आम्ही आपले नोकर आपल्या सेवेला तयार असतांना आपण स्वतः तसदी कशाला घेतां ?

**शिवाजी**:—मी दिलेलं वचन पुरं करण्याकरितां. आपल्या प्राणाचीही पर्वा न बाळगतां, तुम्हीं आजपर्यंत जसं मला साह्य करीत आलां आहांत, तसंच

यावेळींही करा. तुम्ही माझे सेवक नसून या देशाचे सेवक आहांत, या शिवाजीच्या पंचप्राणांतलें दोन प्राण आहांत. तानाजी आणि हिरोजी हीं नांवें जगांत अजरामर रहातील !

---

## प्रवेश २ रा

**स्थळः**—नभाजीरावांच्या वाडयाबाहेरील बाग

( जयंती झोपाळ्यावर बसून झोके घेत आहे. )

**जयंतीः**— पद

**हा जीव झुरे वायां ॥ भासे उदास दुनिया ॥ धृ ॥**
**घडी घडी पाणी ये नयना ॥ बसल्या मुक्याच मैना ॥**
**कटु यातना भुलाया ॥ करूं कोणत्या उपाया ॥ १ ॥**

[ शिवाजी महाराज संन्याशाच्या वेषांत प्रवेश करतात. ]

**शिवाजीः**—बं भोला शिवनाथ दिगंबर ॥ सुखी रखे सबको श्री शंकर ॥

**जयंतीः**—( दचकून ) अगबाई, तुम्ही कोण ?

**शिवाजीः**—माई मैं अेक संन्यासी हूं !

**जयंतीः**—आमच्या वाडयांत इतक्या धाडसानं शिरणारा गोसावी मी आजच पाहिला. जा बाबा. हें मराठयाचं घर आहे. धर्मशाळा नाहीं.

**शिवाजीः**—मैं तो यहां सोच समजके आया हूं.

**जयंतीः**—पण आंत येतांना बाहेरच्या पहारेकऱ्यांनीं अडवलं कसं नाहीं ?

**शिवाजीः**—ईश्वरके सच्चे भगतको अटकाव करनेकी ताकद, किसीमेभी नही होती. शक्ती दुबली बनती है—शस्त्र नकामे हो जाते है—और घमंड चुरा हो जाता हैं. सत्य के सामने पाप दीन बनता है, और दैवी शक्तिके सामने सारी दुनिया कांप उठती है.

**जयंतीः**—आपण तर बरेच तत्त्वज्ञानी दिसतां. पण आपल्यासारख्यांना हें ठिकाण योग्य नव्हे.

**शिवाजीः**—ईश्वरके दासोंके नजरोमें कोनसाभी स्थान रम्य होता है. चाहे वो भीषण स्मसान हो. या शृंगार चीजोंसे सजा हुआ रंगमेहल हो.



**शिवाजी:**——तानाजी आणि हिरोजी ही नांवें या महाराष्ट्रांत गाजत रहातील.

जंगलकी फूटी तूटी कूटी हो–या नीचकृत्योंसे भरा हुआ कोई स्थान हो. संन्यासी जहां जाता है, वही स्थान उसे परम पवित्र और मंगलही दिखता है!

**जयंती**:—मला नाहीं कांहीं समजत यांत ! तुम्ही मुकाट्यानं बाहेर जा कसे

**शिवाजी**:—जानेके लिये मैं तैयार हूं. आप मुझे भिक्षा दीजिये. भिक्षाही हमारा जीवन है.

**जयंती**:—मूठभर भिक्षा द्यायला मी उगीच कशाला मागें येऊं ( जाते.)

[ जयंती भिक्षा आणावयाला आंत गेल्यावर महाराज भजनाचं कडवं गुणगुणत रहातात. नंतर जयंती भिक्षा घेऊन येते व महाराज भिक्षेचा स्वीकार करतात. ]

**शिवाजी**:—भगवान भला करे. आपकी सब मनीषा पूरी हो जाय.

**जयंती**:—इतकं कुठं आहे माझं अभागिनीचं भाग्य ! भिक्षा मिळालेले भिकारी हमेशा असेच आशिर्वाद देत असतात–पण ते कांहीं खरे होत नसतात.

**शिवाजी**:—माई ऐसा नहीं कहेना. सब संन्यासी सरिखे नहीं होते. जहां स्वार्थ का अंश है–वहां इच्छा पुरी करनेकी शक्ति कहां ? पैसा और सुख इन चीजोंका मैने स्वप्नोंमेही ख्याल नहीं किया है. मेरे जैसे रमतेराम यह जग का उद्धार करनेके लिये दिनरात घुमते है. माई मैं दिया हुआ आशिष पूरा हो जायगा ये बात भूलना नहीं.

**जयंती**:—इतक्या शहाणपणाच्या गोष्टी सांगता आणि भिक्षा कां मागतां ?

**शिवाजी**:—भिक्षा मांगना यही संन्यांसीयोंका धर्म है.

**जयंती**:—जा बाबा. आपण एकदां लौकर निघून गेलांत–म्हणजे तवढीच माझ्या जीवाला शांतता मिळेल.

**शिवाजी**:—माई, जबरदस्तीसे दिलका भाव छुप नहीं सकता. आप अपने मूंहपर प्रसन्नता रखने की खूब कोशीस कर रही हो मगर आपके दिल में दुःखका बडा भारी बादल चल रहा है.

**जयंती**:—( स्वगत ) अगबाई, माझ्या हृदयांतील गुप्त भावना यांना कशा

कळल्या ? ( उघड ) महाराज, हरएक माणसाच्या मनांत कुठलेना कुठले तरी विचार वावरत असतातच.

**शिवाजीः**—मगर मै—ये भविष्य जानकर कह रहां हूं,

**जयंतीः**—आपण भविष्यसुद्धां जाणतां ?

**शिवाजीः**—हां माई, मुझे फांसे डालनेसे सारा भूत भविष्यका हाल मालूम होता है.

**जयंतीः**—फांशावरून आपल्याला भविष्य कळतं ? नवलच बाई !

**शिवाजीः**—आश्चर्यकी कोई बात नहीं. यह मानसशक्तिका प्रभाव है. [ फांसे टाकून बोटांची चाळवाचाळव करून स्वतःशीं पुटपुटत. ] सुनीये, आपकी माता, आपको बचपनमें छोडकर उसपार चली गई. सच है ? उनकी आखरी इच्छा, आपका ब्याह हंबीर नामके अेक जवान मर्दके साथ करानेकी थी—और आपके पिताजीसेभी वैसाही बचन मांग लिया था. सच है ये मेरी बाते ?

**जयंतीः**—बरोबर आहे...बरं पुढं.

**शिवाजीः**—( फांसे टाकतात. ) आपको एक छोटा भय्याभी है. क्या उसीका नाम...मरहटी नाम मुंहमें—जल्द आताही नहीं. हां...हां परताप. बडा उमदा और चलाक छोकरा है. है ना ? इस साल तक आपके पिताकी मनीषा बदली नही थीं...मगर आपके खूबसूरतीपर पागल होकर—मनाजी पटेल आपसे ब्याह करना चाहता है. सच है यह भी ? अेक दिन देवीके मंदीरमें, मनाजीने आपसे जबाब मांगनेकी कोशीसभी किईथी. मगर आप राजी न होनेपर—वो जबरदस्तीसे आपको पकडना चाहताथा. उसी वक्त, ऐन मोकेपर हंबीरने आकर आपको छुडाया था. क्या सच है यह भी ?

**जयंतीः**—( स्वगत ) अगबाई ! खरंच चमत्कार आहे. यांचं सांगणं अगदीं बरोबर आहे. खरोखरच यांना भविष्य कळतं आहे—का कुणी मानाजीचा हेर आहे हा ? तसाच प्रसंग आला—तर जंबिया आहेच माझ्या कमरेला. [ उघड ] महाराज...आपलं सांगणं अगदीं खरं आहे....बरं पुढं....

**शिवाजीः**—( फांसे टाकतात. ) मनाजीका यह डाव फंस गया बाद,

आपके पिताको पैसके लालचमें फंसाकर, उसने आपको समझानेके लिये कहा लाख मिन्नते करने परभी आप राजी नही हुअी, ये देखकर, हंबीरको दगलबाजीसे पकडाकर कैदखानेमें डाल दिया....क्या यह भी बाते सच है !

**जयंती**:—महाराज, आपले फांसे अचूक भविष्य वर्तवितात यांत शंका नाहीं. पण पुढं माझ्या नशिबीं काय आहे तें सांगाल का हो ?

**शिवाजी**:—( फांसे टाकतात. ) हां....हां उसीमें क्या बडी बात है ! थोडीही मुद्दतमें आपका ब्याह मनाजीके साथ होनेवाला है।

**जयंती**:—अशक्य ! अगदीं अशक्य गोष्ट आहे ! आपलं भविष्य इथं मात्र चुकतं आहे खास !

**शिवाजी**:—माई, मेरा भविष्य कभीभी झूटा नही हो सकता.

**जयंती**:—मानाजीशीं माझं लग्न होणं या जन्मीं तरी शक्य नाहीं. मनानं मी सर्वस्वी हंबीररावांची झालेली आहें. जिवाशिवाच्या साक्षीनं आमचं लग्न होऊन गेलं आहे.

**शिवाजी**:—लेकिन मनाजी-जबरदस्तीसे आपके साथ शादी करनेकी कोशीस करेगा तो ?

**जयंती**:—या जयंतीच्या प्रेताशींच त्याला लग्न लावावं लागेल. खरंच महाराज, आपले फांसे या बाबतींत खोटे ठरणार ! आणखी एक प्रश्न विचारते, शिवाजी महाराज आग्र्याहून खरंच सुटले का हो ?

**शिवाजी**:—[ फांसे टाकून ] हां--हां छूट तो जरूर गये है-

**जयंती**:--मग देवच पावला !

**शिवाजी**:—और बहोतही जल्द यहां आकर आपका ब्याह मनाजीके साथ करानेवाले है।

**जयंती**:—महाराज असला अविचार कधींही करणार नाहींत. त्यांना हृदय असेल-मायेची ओळख असेल-आणि प्रेमाची पारखही असेल, तर ते असलं कृत्य कधींही करणार नाहींत. आणि माझ्या दुर्दैवानं तसाच प्रसंग आला-तर महाराजानीं आपल्या अधिकाराच्या धाकानं माझा सर्वस्वी सत्यानाश केला-असंच मी म्हणेन.

**शिवाजी**:—उनीके मुंहपर यह सब बातें सुना सकती हो !

**जयंतीः**—खरं बोलायला मी कुणाला कां भ्यावं? चक्क महाराजांच्या तोंडावर सांगेन–कीं महाराज, आपल्याला दया नाहीं, विचार नाहीं, अंतःकरण नाहीं, आणि प्रेमाची पारखही नाहीं. आपलं राज्य न्यायाचं नसून, अन्यायाचं, जुलूमाचं...

**शिवाजी:**—हं–हं. जयंती पुढील शब्द उच्चारण्याचं धाडस या शिवाजीसमोर तूं करू नकोस. ( वेष काढून टाकतात.)

**जयंतीः**—अगबाई! कोण? महाराज शिवाजीमहाराज? मग आतांचे संन्याशी कुणी लुटारू होते कीं ठग?

**शिवाजी:**—शिवाजी ठग नाहीं, लुटारू नाहीं आणि दरोडेखोरही नाहीं. हें प्रत्यक्ष पहा! ठग, चोर, लुटारू आणि दरोडेखोर हीं असलीं दुष्ट नांवं माझ्या शत्रूनीं माझा उत्कर्ष सहन न झाल्यामुळं मला दिलीं आहेत. स्वतःचीं कृष्णकृत्यें छपविण्याकरितां दुसऱ्यांना नांवं ठेवणारेच, लुच्चे, लफंगे आणि दरोडेखोर असतात. हा शिवाजी देशहिताची दिक्षा घेऊन–स्वतःच्या सुखाची पर्वा न करितां स्वराज्य स्थापनेकरितां धडपडणारा एक संन्यासीच आहे. जयंती, जुलमी दावेदारांचा दुष्मन हा शिवाजीच तुझ्या पुढं उभा आहे!

**जयंतीः**—महाराज, मला क्षमा करा. मी वेडी भलतंच बडबडले. उघडपणें यायला आपल्याला पूर्ण मोकळीक असतांना या गुप्त वेषानं येऊन–

**शिवाजीः**—तुझ्या प्रेमाची परीक्षा पहायची होती!

**जयंतीः**—मग–

**शिवाजीः**—परीक्षा पुरी झाली आतां फक्त कृती व्हायची शिल्लक आहे. हंबीररावांचं लग्न तुझ्याशींच करून देईन, असं मी त्यांच्या वडिलांना वचन दिलं होतं, तें मला पुरं करायचं आहे. आणि खोटयाच्या कपाळीं कुऱ्हाडीचा घाव कसा बसत असतो–हें पण लोकांना पटवून द्यायचं आहे. पण त्याला तुझ्या संमतीची जरूरी आहे.

**जयंतीः**—माझ्याकडून होण्यासारखं असेल तितकं सहाय्य मी अवश्य करीन.

**शिवाजीः**—चल पुढं काय करायचं ते सगळं तुला नीट समजावून सांगतों. ( जातात.)

## प्रवेश ३ रा.

स्थळः—तुरुंगाची चौकी.

[ दौलतराव लावणी म्हणत असून तिघे शिपाई मजेने ती ऐकत आहेत ]

**लावणी.**

**रंगेल नार नवी ॥ ढंग दावि अति ॥**
**शोभे रंग गुलाबी गालीं ॥**
**धुंद नेत्र किती ॥ तंग चोळी अति ॥**
**रसरंगी ज्वानी नवती ॥ धृ० ॥**
**किती चमकत ठुमकत चाले ॥**
**लई लाजुनी गुलगुल बोले ॥ डौल भारी ॥**
**ही मजला वेडा करी हो ॥**
**भूल पडे बघुनि हिज अति ॥ १ ॥**

( लावणी संपतांक्षणींच शिवाजी महाराज साधु वेषांत प्रवेश करतात. )

**शिवाजीः**—बं भोला शिवनाथ दिगंबर ॥ सुखी रखें सबको श्रीशंकर ॥

**१ ला शिपाईः**—ए, कोण आहे ?

**शिवाजीः**—मी एक साधु आहे !

**२ रा शिपाईः**—इकडे काय काम आहे तुझं ? धर्मशाळा आहे वाटतं ही!

**दौलतः**—अहो साधु महाराज हा तुरुंग आहे तुरुंग. चला चालते व्हा इथून.

**शिवाजीः**—अहो, असे रागावूं नका जरा ऐकून तर घ्याल. मी तुमचं भविष्य सांगतों, झालेल्या गोष्टी पटवून देतों आणि पुढं होणाऱ्या गोष्टी अगदीं तंतोतंत सांगून टाकतों.

**दौलतः**—मग, बसा. बसा असे. हें पहा माझ्या मनाला रुचेल तें सांगा. नाईटसाईट सांगू नका हं !

**शिवाजीः**—आई अंबाबाईच्या कृपेनं मी ही कला थोडी फार जाणतों, पण खरं सांगायला मी कुणालाही भिणार नाहीं. आहे कबूल ? हो आपलं अगोदरच सांगून ठेवतों.

**दौलतः**—कबूल—कबूल आहे बुवा ! मग दाखवूं माझा हात ?

**शिवाजीः**—छे. छे. छे. हात पाहून सांगत नाहीं मी-फांसे टाकून भविष्य पहातों. मग टाकूं फांसे ?

**दौलतः**— हो, हो. करा सुरवात.

**शिवाजीः**— पण विचारीन त्या प्रश्नांची उत्तरं अगदीं बरोबर-आणि कांहींएक न छपवितां दिली पाहिजेत. आहे कबूल ?

**दौलतः**—कबूल आहे. सारं कांहीं कबूल आहे. ए, तुम्ही बसा जाऊन तिकडे, [ शिपाई जातात. ]

**शिवाजीः**—[ फांसे टाकून, बोटं मोजून, आणि तोंडानं पुटपुटण्याचा आविर्भाव करून ] हां हां आपलं नांव--द-- द--दा--दो— दौलतराव-? आं ! मोठाच चमत्कार आहे बुवा !

**दौलतः**—आं ? काय म्हणतां काय ? नांव कस ओळखलंत हो ?

**शिवाजीः**—ही सारी फांस्याची करामत आहे. वा...वा...वा...मोठे दैववान आहांत बुवा ! नशीबांत दौलत भरपूर आहे. जमीनजुमला पण आहे. अगदीं आबादीआबाद-भांडार भरपूर !

**दौलतः**--( आनंदानं ) भांडार भरपूर ! आबादीआबाद ! काय म्हणतां काय ?

**शिवाजीः**—अहो हा फांसा सांगतो आहे ना ? अगदीं मरेपर्यंत सारखी चैन चालणार आहे तुमची म्हणून ? धनलाभाचा मोठा जबरदस्त योग्य आहे पण राव, पैसा मिळाल्यावर या गरिबाची आठवण ठेवाल कां ?

**दौलतः**—नुसती आठवणच काय चांगली बिदागी देईन तुम्हांला. पण काय हो, इतका पैसा मिळणार कुठून-आणि कसा--तें तर कळूं द्यां. सांगा-पटकन् सांगा ?

**शिवाजीः**--सांगतों-सारं कांहीं सांगतों. अशी घाई करूं नका. या घाईनंच तुमची सारी कामं फसतात. कां खरं कीं नाहीं ?

**दौलतः**--खरं आहे बुवा. आपण कबूल करतो.

**शिवाजीः**--(फांसे टाकून) हो- हो चढती पायरी ! पहिला धनलाभ तर आहेच, त्याच्या जोडीला अधिकार लाभ पण आहे. कुठल्यातरी कामगिरीबद्दल

नोकरच सरदारी मिळणार आहे—ती कामगिरी तशीच जोखमीची आणि गुप्तही आहे.

**दौलतः**—गुप्त कामगिरी ? कुठली बरं—

**शिवाजीः**—हं-हं. असे घोटाळूं नका. अहो, ती पण सांगून टाकतो. ह-ह-हंबीराला ठ-ठ-ठा—

**दौलतः**—( भान न राहून ) ठार मारायची ! हीच कीं नाहीं ?

**शिवाजीः**—बस बस. अगदीं बरोबर बोललांत. तुमचं रहस्य कसं पटकन बाहेर काढलं मी ! याला म्हणतात डोकं ! उगीच नाहीं सारं आयुष्य या धंद्यांत घालविलं तें !

**दौलतः**—खरं आहे बुवा ! मानाजीराव, नभाजीराव आणि मी ! अशा तिघांनीं हा बेत ठरवून टाकला आहे. पण ही गोष्ट कुठं बोलूं नका हं ! कारण कुणालाहि ही बातमी सांगायची नाहीं—अशी ताकीद आहे मला. एव्हांना हें काम पार देखील पडलं असतं, पण ते शिवाजी महाराज आग्र्याहून फरारी झाले ना ! त्यामुळं हा सगळा घोटाळा झाला. एकदां ती पीडा इथून येऊन गेली कीं या हंबीराचा मुडदा पडलाच म्हणून समजा !

**शिवाजीः**—असलीं कामं करतांना शिवाजी महाराजांची भीति वाटत नाहीं तुम्हांला ?

**दौलतः**—त्यांना काय भ्यायचं ? मागं मी मुसलमानाच्या बाजूनं लढत असतांना ते तीन वेळां माझ्या हातीं सांपडले होते. बिचारे शरण आले, अगदीं गयांवयां करूं लागले. आपल्याला दया आली. मग दिलं सोडून नि काय ! त्यांना कसलं भ्यायचं. अगदींच गबाळ्या माणूस तो !

**शिवाजीः**—अहो असलं भलतं-सलतं कांहीं बोलूं नका त्यांचे हेर म्हणे वेष पालटून फिरत असतात, पटकन् कुणी ऐकायचा आणि भलताच प्रसंग यायचा ? खुद्द महाराजसुद्धां वेष पालटून फिरत असतात म्हणे ! तर संभाळा बुवा, जर कां ते तुम्हांला भेटले तर— '

**दौलतः**—भेटूं द्या तर खरं. त्यांना शरण आलेल्यांची आठवण करून देईन. भितो कोण त्यांना ? बाकी तुम्हीं भविष्य सांगण्यांत हुशार आहांत खरे !

**शिवाजी**:—आमचं सांगणं बरोबर पटलं नाहीं तर आम्ही भविष्यवादी कसले ? आणि या धंद्याचा उपयोग तो काय ? पण काय हो ? तुमचं ते....हे.... मानाजीराव फार-फार—

**दौलत**: —लबाड आहेत अमंचना ? बोलायची गोष्ट नाहीं, पण तुमच्या-जवळ बोलायला हरकत नाहीं-कारण भविष्यानं जाणतांच सारं तुम्हीं ! अहो, चोर, दरोडखोर तर पक्के ! बायकांच्या बाबतींत तर फार पुढं गेलेले. कुठं हार म्हणून टाऊक नाहीं स्वारीला ! पण एकदां जिरली बरं का ! ती नभाजीची मुलगी जयंती-तिला गेले बडेजाव दाखवायला. आणि कुठं ? देवीच्या देवळांत. पण ती पोरगी पडली वस्ताद ! लागली शिव्या द्यायला. मग ही स्वारी चिडली आणि गेले जुलूम करायला तिच्यावर ! पण ऐन वेळेवर त्या हंबीरानं येऊन यांची अगदीं खासी जिरवली बरं का ! आणि त्याबद्दल खोटा आरोप ठेऊन त्या हंबीराला तुरुंगात ठेवलं आहे....त्याच्यावरच माझा पहारा चालू आहे. पण जाऊं द्या ही कटकट ! आमच्या संबंधानं आणखी कांहीं सांगा पाहूं !

**शिवाजी**:—( फांसे टाकून ) तुम्हांला घरचंसुद्धा सुख चांगलंसं दिसत नाहीं. तुमची बायको तुमचा छळ करीत असावी !

**दौलत**:—कशी अगदीं लाखांतली गोष्ट बोललांत ! शंभर हिऱ्यांनीं बरोबर ! आतां सांगायला लाज वाटते, पण तुमच्याजवळ काय लपतं आहे ? अब्रू संभाळण्याकरितां तिच्या पायांसुद्धां पडतो हो ! तिला ताळ्यावर आणा-यला कांहीं तरी उपाय सांगा. मग अशी लेखी करतो कीं देखते रहो.

**शिवाजी**:—चांगले ठसठसीत दागिने दिले कीं झालं बायकांचं बोलणं बंद !

**दौलत**:—अहो तेसुद्धां दिलं, हंबीरगावाच्या घरीं जप्ती केली, तेव्हां त्यांतले कांहीं दागिने कुणाच्याही नकळत घेऊन तिला दिले. चांगले मौल्य-वान दागिने ! पण म्हणतात ना ? भिकाऱ्याच्या पोरीला ओकारी फार ! पक्की अवदसा ! तिनं ते दागिने अंगावर घातले नाहींतच, पण त्यांचं काय केलंन्.

याचा थांगपत्ता पण लागूं देत नाहीं. विचारायला जावं, तर एकेक....डोळे.... हे....हे....हे असे मोठे करते—

( तानाजी आणि हिरोजी अत्तरवाल्यांच्या वेषांत एकमेकांशीं हुज्जत घालीत प्रवेश करतात. )

**तानाजी**:—मेरा इतर बढीया है !

**हिरोजी**:—मैं कहता हूं मेरा बढीया हैं.

**तानाजी**:—तेरेपास सबूत क्या है ?

**हिरोजी**:—अच्छे मालको सबूतकी क्या जरूरत हैं ? अच्छा तो अच्छाही होती हैं !

**दौलत**:—अरे ए-इथं काय बाजार मांडायचा आहे वाटतं ? या तुरुंगाजवळ गडबड करूं नका. पहा हा साधुबुवा ! कुत्रेसुद्धां कुजक्या हाडां-करितां इतक्या जिकिरीनं भांडत नसतील !

**शिवाजी**:—अहो—अहो असे भांडता का ? इकडे या ! तुमच्या भांडणाचा निकाल मी लावतों.

**तानाजी**:—देखिये हुजूर, नाईकसाब आप देखिये, शिपाईसाब, आइये, आइये. आप भी देखिये ! (शिपाई जवळ येतात) यह शक्स चिल्लाता है के मेरे अत्तरसे बढकर अत्तर इस दुनियामें हैही नहीं ! ये कोई बात करनेकी तमीज !

**शिवाजी**:—वाहवाः ! तुझ्या अत्तरासारखं अत्तर दुनियेंतसुद्धां मिळणार नाहीं ?

**दौलत**:—ए, अशा बडया बडया बाता मारल्यानं मोठेपणा येत नसतो !

**हिरोजी**:—सुनिये हजरत, बढाई की बात नहीं है ! मेरा अत्तर कन्नोज के बगीचेका खजाना है. देखिये आप देखिये—अजमा लिजिये—आखीर परीक्षा तो जरूर हो जायगी !

[ कुपी उघडून सर्वांना हुंगायला देतो व शेवटीं महाराजांजवळ आला असतांना ते नाकारतात. ]

**शिवाजी**:—अरे बाबा ! मला गोसाव्याला अत्तराची काय परीक्षा ?

**हिरोजी**:—सच कहिना ! मेरा अत्तर बढिया है या नहीं ? खुशबू लेतेही दिलपर असर होना चाहिये !

**तानाजीः**--दिलपर असर की क्या बडी बात है. मेरे अत्तरके खुशबूंस सारे बदनपरभी असर होती है ! मेरेपास एसी उमंदी चिजे है, के बडे बडे खांसाहेब, खानबहादुर, राजे महाराजे तक मंगनी करते है.

**दौलतः**—वा ...वा...वा. मग तुमचंच चांगलं...चांग...लं...चां...ग..लं ! [ बेशुद्ध होतो. शिपाईपण एकापाठीमागून एक बेहोश होऊं लागतात, ]

**हिरोजीः**—इसमें क्या बडी बात है. मेरेपास राजा इंद्रने मो हांडे मंगवायते....अरे ऐकायला कुणीच सावध नाहीं.

**शिवाजीः**—इथपर्यंत तर आपलं काम ठीक पार पडलं आहे. औषधानं चांगलाच गुण दिला. तुम्ही इथं पहारा करा. मी आंत जाऊन हंबीररावाची भेट घेऊन येतो.

**तानाजीः**—महाराज, घात झाला ! ते पहा मानाजीराव आणि नभाजीराव इकडेच येत आहेत. आतां ?

**शिवाजीः**--हिरोजी, अगोदर ती सावध करण्याची कुपी दौलतच्या नाकाजवळ धर [ हिरोजी कुपी काढून दौलताच्या नाकाजवळ धरतो. ] आतां उचला या शिपायांना आणि बाजूला घेऊन चला ! त्यांचे कपडे अंगावर घालून आपल्याला आतां शिपाई बनलं पाहिजे ! ( शिपायांना आंत नेऊन त्यांचे कपडे अंगावर घालून बाहेर येतात. ) आता घेतलेल्या सोंगाची बतावणी अगदीं बेमालूम वठली पाहिजे.

**तानाजीः**--त्याची नको काळजी. महाराज, हा दौलत शुद्धीवर येऊं लागला!

**हिरोजीः**--अहो उठा ! उठा !

**दौलतः**--उठा काय ? मी झोंपलों आहे कुठं ? [ पुन्हां पडतो. ]

**हिरोजीः**--अहो मानाजीराव माने येत आहे.

**दौलतः**--आं ? खरं कीं काय ? ( उठून ) माझी पगडी, तलवार, अरेरे लौकर आणारे. सुस्त, आळशी, ऐदी कुठले ! [ नाचून धांदल करूं लागतो-मानाजीराव व नभाजीराव येतात.

**मानाजीः**--कां दौलत ! ठीक चाललं आहे ना ? त्या प्रेमानं पिसाट बनलेल्या कुत्र्याला बाहेर काढ !

**दौलतः**--जा रे तुम्हीं दोघेजण ! [ तानाजी व हिरोजी जातात. ]

**मानाजीः**--पाहिलंत नभाजीराव! याला म्हणतात नोकर! आमचा दौलत विश्वासांतला विश्वासू ! कामचुकारपणाचं नांव नाहीं. खरं कीं नाहीं दौलत ?

**दौलतः**-- होय सरकार ! हंबीररावासारखा माणूस आंत कैदेंत आहे, तो पळून जाऊं नये म्हणून डोळ्यांत तेल घालून पहारा करतों ना मी ! हो, हंबीरराव पळाला कीं आमची सरदारी पण पळायची !

**नभाजीः**--आमचासुद्धां कारभार लगेच संपायचा ! दौलतराव, नीट जपा हं, एकदां महाराज येऊन गेले कीं बनलोंच आपण राजे !

**दौलतः**--पण हे महाराज केव्हां येणार ?

**नभाजीः**--मानाजीराव, महाराजांच्या अकस्मात येण्यानं आपला बेत कसा काय पार पडतो याची शंका वाटते मला !

**मानाजीः**--त्याची अगदीं काळजी करूं नका ! मी महाराजांना अश्या ऐषआरामांत गुंगवून टाकतों कीं, हंबीरची गोष्ट विचारण्यांचं त्यांना भानच राहूं नये. ( हंबीररावाला आणतात. ) कां हंबीर, कसं काय चाललं आहे ?

**हंबीरः**--ठीक चाललं आहे !

**मानाजीः**--तुरुंगांत मजा वाटते कीं नाहीं ?

**हंबीरः**--पुष्कळ मजा वाटते. दिवसाढवळ्या अघोरपातकांची रास करून वर आणखी उजळ माथ्यानं वावरणाऱ्या तुम्हांसारख्या बेशरम माणसांचीं तोंडं पहाण्यापेक्षां--तुरुंगातल्या काळ्याकुट्ट अंधारांत काळ कंठण्यांत पुष्कळ मजा वाटते!

**मानाजीः**--असा बेफाट बडबडूं नकोस. आपल्या अमूल्य जीवाला फक्त प्रेमाकरितां कां बळी देतोस ?

**हंबीरः**--अगोदर स्वतःसंबंधानं विचार कर आणि मग मला काय तें विचार!

**मानाजीः**--एका शब्दानं तुझे सगळे हाल नाहींसे होतील; तुझी संपत्ति तुला परत मिळेल.

**हंबीरः**--संपत्तीची, मानाची आणि प्राणाचीही पर्वा मी आजपर्यंत बाळगली नाहीं आणि पुढंही बाळगणार नाहीं.

**मानाजीः**--नादान मनुष्या! कुणासमोर काय बोलत आहेस? या उद्दामपणाचा परिणाम अखेर जड जाईल. तुझं डोकं धडापासून वेगळं होईल.

**हंबीरः**--काय वाटेल तो परिणाम होऊं दे. तो मी सोसायला तयार आहे!

**दौलतः**—कर–कबूल कर! कबूल करून जीव वांचीव. नाहीं तर डोकं मारलं जाईल नां?

**मानाजीः**—चला घेऊन याला! संध्याकाळचं अन्नसुद्धां देऊं नका. पाजी हरामखोर, माथेफिरू कुठला! [ शिपाई हंबीररावाला नेतात. ]

**दौलतः**---जा--जा–जा. मूर्खासारखं बडबडतोय. जाऊं द्या हो सरकार, परवां होईल ठार!

**मानाजीः**-- महाराज येऊन जाऊं देत. या हरामखोराला मी जिवंत जाळल्यावाचून रहाणार नाहीं. चला नभाजीराव, पुढं कसं वागायचं तें तुम्हांला समजावून सांगतो. दौलत, नीट संभाळ!

**दौलतः**—अगदीं बिनधास्त असा सरकार! असा पहारा करतों कीं देखते रहेना मालीक! [ मानाजीराव व नभाजीराव जातात. ] कायेर, आतां ऐकलंतना, मी केवढा मोटा सरदार होणार आहे तो? [ तानाजी व हिरोजी येतात. ]

**शिवाजीः**—हो–हो–पण गरिबांची आठवण राहील का?

**दौलतः**---मघांचे ते अत्तरवाले कुठे गेले? माझ्या सरदारीच्या समारंभाकरितां त्यांच्याकडून अत्तर घ्यायचं होतं मला!

**तानाजीः**—मघां वास घेता घेतां तुम्हांला झोंप लागली... बिचारे कंटाळून निघून गेले.

**दौलतः**—त्यांना जरूर शोधून आणा गड्यांनों. खरंच त्यांचं अत्तर चांगलं होतं!

**शिवाजीः**—( एकीकडे ) गेले का ते लांब?

**हिरोजीः**—गेले–अगदीं दृष्टीआड झाले.

**शिवाजीः**—मग या सरदारसाहेबांना बंदगी बिंदगी कराल कीं नाहीं!

**तानाजी**:—हो हो. बंदगी सरदारसाहेब–[ लवून मुजरा करतो, दौलत पण नेहमींच्या सरावानं तसाच लवून मुजरा करतो. ]

**शिवाजी**:—हं-हं सरदारसाहेब, तुम्हीं आतां असा लवून मुजरा करायचा नाहीं. छाती ताठ ठेवून नुसती मान हालवायची....करार, या सरदारसाहेबांचा अगदीं चांगला सन्मान करा ! ( तानाजी व हिरोजी त्याला पकडूं लागतात. )

**दौलत**:—अरे-अरे, हें काय ? असं काय करतां तुम्हीं ? मी तुमचा सरदार होणार आहे ना ? मला असे धरतां कां ?

**शिवाजी**:—दौलत ! कोण तुला तीन वेळां शरण आला होता ? मी-हा शिवाजी ? ( वेष काढून टाकतात. )

**दौलत**:—कोण महाराज, अरे बापरे ! आतां भरली कंबक्ती ! महाराज, मला क्षमा करा मी पाया पडतो.

**शिवाजी**:—तानाजी, चढव या बदमाषाच्या हातांत बेड्या ! आणि गुप्तपणें नेऊन ठेव आपल्या तंबूंत !

**दौलत**:—धांवा हो–धांवा–मला हे—

**हिरोजी**:—पागल तोंड आटप. उगाच ओरडशील तर मार खाशील पोटभर !

**दौलत**:—राहीलं. मिटलं तोंड. पण माझं काय करणार हो ?

**तानाजी**:—भला, भला मोठा सरदार करणार !

**शिवाजी**:—हिरोजी याचा चेहरा नीट पाहून ठेव. याचा वेष घेऊन तुला इथं पहारा करायचा आहे.

**हिरोजी**:—आज्ञा महाराज.

**तानाजी**:—हं, सरदारसाहेब चला-अहो असे भिता काय ? सरदारी पाहिजे ना !

**दौलत**:—नको नको ती सरदारी ! तरी माझी बायको सांगत होती—
[ दौलतला नेऊं लागतात, पडदा पडतो. )

---

## प्रवेश ४ था.

( **स्थळ**—छावणी-रस्ता. )

**लक्ष्मी**:—सांगा तानाजीराव, ते कुठं आहेत? त्यांचं काय झालं तें सांगा.

**तानाजी**:—मला कांहीं माहिती नाहीं. आपण कुठं चौकशी केलीत का?

**लक्ष्मी**:—परवांपासून मी सगळीकडे सारखी शोधतें आहे, पण कुठं कांहीं पत्ताच लागत नाहीं; तुरुंगाजवळ-हिरोजरिावांना विनंती करतांच त्यांनीं मला आपल्याकडे पाठवलं आहे....मग सांगा...

**तानाजी**:—[ समजून जाऊन ] बाई, दौलतराव सुरक्षित आहेत.

**लक्ष्मी**:—कुठं आहेत....काय करीत आहेत ते?

**तानाजी**:—बाई त्यांच्या संबंधानें आज मला कांहीं एक सांगतां येत नाहीं.

**लक्ष्मी**:—मला एकदां तरी त्यांची नजरभेट घेऊं द्या. त्यांच्याशीं दोन शब्द बोलूं द्या!

**तानाजी**:—माझा नाइलाज आहे. मी फक्त हुकूमाचा ताबेदार... महाराजांच्या आज्ञेवांचून मला कांहींएक करतां येत नाहीं.

**लक्ष्मी**:—तानाजीराव, मी आपल्याला इतकी मदत केली...सारी बित्तंबातमी सांगितली, त्याचं हेंच फळ का?

**तानाजी**:—बाई, तुम्हीं बजावलेली कामगिरी इतकी महत्त्वाची आहे कीं महाराज ती खात्रीनं विसरणार नाहींत. मी पुन्हां सांगतो, दौलतराव सुरक्षित आहेत.

**लक्ष्मी**:—पण पुढं काय होणार त्यांचं?

**तानाजी**:—तें आज मला कसं सांगतां येणार?

**लक्ष्मी**:—मी आपले पाय धरतें ( तानाजीचे पाय धरते. ) मला त्यांच्या-बद्दल हमी मिळाल्याखेरीज मी आपले पाय सोडणार नाहीं.

**तानाजी**:—बाई, असा भलताच आतताईपणा करून—

**लक्ष्मी**:—तुम्हीं काय वाटेल तें म्हणा, पण माझ्या हृदयांत काय चाललं आहे हें आपल्याला कसें कळणार? तुम्हीं मला वचन दिल्याखेरीज मी

खरोखरच आपले पाय सोडणार नाहीं. आणि आपल्यामुळंच हा प्रसंग माझ्या-वर ओढवला आहे.

**तानाजीः**—मी दौलतरावाकरितां महाराजांजवळ रदबदली करून, त्यांना सोडविण्याचा प्रयत्न करीन...झालं...उठा, अगदीं बिनधास्त असा.

**लक्ष्मीः**—( उठून ) पण—तानाजीराव—

**तानाजीः**—लक्षांत ठेवा, हे तानाजीचे शब्द आहेत. तानाजी बोलल्या बोलाला माघार घेत नसतो. दोनच दिवस धीर धरा. सर्व कांहीं ठीक होईल.

**लक्ष्मीः**—आपले उपकार मी कधींही विसरणार नाहीं. देव आपलं भलं करो ! ( तानाजी जातो. )

देवा, माणसांवर संकटं आणून तूं त्यांची परीक्षा पहातोस का ? का ही सगळी तुझी माया आहे ?

— पद —

**नाटकी तव माया भुलवि जग ॥**
**रूप मनोहर दावि किती पहा ॥ धृ० ॥**
**छुम छुम नर्तन करीत नटी जणुं ॥**
**नव नव अभिनय दावि ढंग महा ॥ १ ॥**

---

## प्रवेश ५ वा

**स्थळः**—मानाजीरावांचा दरबार

( मध्यस्थानीं शिवाजी महाराज बसले असून त्यांच्या उजव्या बाजूस मानाजीराव, नभाजीराव, सरदार, डाव्या बाजूस तानाजी व इतर लोक बसलेले असतात. )

**शिवाजीः**—मानाजीराव, नभाजीराव, आणि इतर लोकहो, आपण जो माझा सन्मान केलांत तो माझा नसून मी जें कार्य आरंभिलं आहे त्याचा आहे, असंच मी समजतों. गौरव माणसाचा करायचा नसून—त्याच्या कृतीचा करायचा असतो. माणूस मरून जातो पण त्याचं कार्य मात्र मागं रहातं.

अग्र्याला जाऊन मला कैद स्वीकारावी लागली, याबद्दल मला वाईट न वाटतां उलट आनंदच वाटत आहे. कारण दरबारचं निरीक्षण करण्याची संधि मला मिळाली. तिथलं राजकारण, दरबारी चालीरिती, आणि हमेशा चालणारे डावपेंच यांची मला कल्पना आली, शिवाय माझ्या गैरहजेरींत आपल्या लोकांना स्वतंत्र रितीनं कारभार चालविण्याची हिंमत पैदा झाली. माणसाच्या अंगावर जबाबदारी पडल्याखेरीज त्याच्या अंगीं असलेल्या गुणांची परीक्षा होत नसते. मानाजीराव, माझ्या गैरहजेरींत तुम्हीं आपल्या प्रदेशाचा चांगला बंदोबस्त ठेवलात याबद्दल मी तुमचं अभिनंदन करतों.

**मानाजीः**—महाराजांचा मी फार ऋणी आहे.

**शिवाजीः**—लोकहो, मानाजरिावांसारखे राजनिष्ठ लोक, माझ्या कार्यात मदत करीत आहेत म्हणूनच माझं कार्य सुरळीत चाललं आहे. पण या मंडळींत हंबीरराव कुठं दिसत नाहींत ते ? माझ्या येण्याची खबर अगोदर कळूनसुद्धां ते माझ्या भेटीला कां आले नाहींत ?

**मानाजीः**—महाराज, हंबीरराव सध्यां मोकळे नसून, कैदेंत आहेत.

**शिवाजीः**—ते कां ?

**मानाजीः**—आपल्या नियमांप्रमाणं मी माझा कारभार पहात असतांना हंबीरराव आपल्या इच्छेला येईल ती गोष्ट करण्याकरितां मला प्रतिकार करूं लागले. मी पुष्कळ वेळां त्यांना समजावून सांगितलं—आपली भीती पण घातली—पण अखेर त्यांनीं माझ्यावरच शस्त्र उचललं. इतकंच कशाला, या नभाजीरावांच्या मुलीशीं फंदफितुरी करीत असतांना मी त्यांना पकडलं, आणि नाइलाजानं कैदेंत ठेवून दिलं आहे.

**शिवाजीः**—आश्चर्य आहे ! नभाजीरावांसारख्या घरंदाज मराठ्यांच्या इज्जतीचा हा प्रश्न आहे.

**नभाजीः**—होय महाराज. जर मानाजीरावांनीं मला साह्य केलं नसतं तर माझ्या अब्रूचे धिंडवडे निघाले असते.

**शिवाजीः**—हंबीरराव आपल्या बापापेक्षां शूर हिंमतवान आणि लाखांत

नांव काढणारे वीर निघतील अशी मला मोठी उमेद होती. पण तारुण्यांचं बेफाम वारं माणसाला अविचारी करून सोडीत असतं. आपल्या आज्ञेशिवाय मी कुणावरही शस्त्र उचलणार नाहीं, या वचनाचा मानाजीरावांवर शस्त्र उगारून त्यानीं भंग केला आहे. माझ्याशींसुद्धां त्यानीं दगलबाजी केली आहे. शाबास मानाजीराव, असल्या विश्वासघातक्याला तुम्हीं कैदेंत टाकलंत हें चांगलं केलंत. त्यांना योग्य ती शिक्षा झालीच पाहिजे. [क्षणभर विचार करीत] मानाजीराव, हंबीररावांच्या कडेलोटाची तयारी करायला सांगा.

**तानाजी**:— पण महाराज, या आनंदाच्या प्रसंगीं—

**शिवाजी**:—कर्तव्यापुढं आनंदाची काय पर्वा ? आनंद विलासी लोकांसाठीं— चैनीलोकांसाठीं आहे. ज्यावेळीं कर्तव्य पुरं होत असतं, त्याचवेळी या शिवाजीला खरा आनंद होत असतो. मानाजीराव, हंबीररावांना माझ्यापुढं आणायला सांगा. अगोदर मला त्यांची चांगली हजेरी घ्यायची आहे.

**मानाजी**:— तो बेफाम बनलेला माणूस आपल्याला वाटेल तें बोलला तर—?

**शिवाजी**:—मानाजीराव, माझ्यासमोर माझी बेअदबी करण्याची हिंमत, प्रत्यक्ष अवरंगजेबाला झाली नाहीं ती इतर कुणांला होणार आहे ? बेअदबी करायला देखील अंगीं हिंमत असावी लागते. हे हंबीरराव तितकेच हिंमतवान असले—तरी कोणत्याही माणसाचं बोलणं शांतपणें ऐकून घेण्याची मी संवय करून घेतली आहे. इतकंच काय, माझ्या राज्यपद्धतीबद्दल जर खुल्या दिलानं आणि निधड्या छातीनं माझे दोष कुणी सांगू लागला, तर मी माझ्या सत्तेचा दुरुपयोग न करतां—त्याचा गौरवच करीन. मानाजीराव, माझ्यापेक्षां तुम्हीच जास्त भीतां आहांत ? चला, त्यांना ताबडतोड इथं आणायला सांगा.

**मानाजी**:—शिपायांनो, हंबीररावांना घेऊन या. ( शिपाई जातात. )

**शिवाजी**:—हंबीररावांसारखे शहाणे समजूतदार तरूण जर भलते थेर करूं लागले, तर त्यांना योग्य ती शिक्षा करणं हेंच माझं कर्तव्य आहे. या कर्तव्यांत जर मी कसूर केली तर न्यायाची विटंबना होईल, राजनियमांचे धिंडवडे निघतील. कां मानाजीराव, माझं म्हणणं बरोबर आहे कीं नाहीं ?

**मानाजीः**—आपण जें कराल तें योग्यच कराल असं मला वाटतं. आज आपण जर त्यांच्यावर दया केलीत तर सारे लोक आपल्याला नांवं ठेवल्या-खेरीज रहाणार नाहींत.

[ शिपाई हंबीररावांना घेऊन येतात. हंबीरराव महाराजांना पाहून आनं-दीत होऊन मुजरा करतो. महाराज तिरस्कारानं तोंड बाजूला फिरवितात. ]

**शिवाजीः**—हंबीरराव, तुमच्यासारख्या देशद्रोह्याचं तोंड देखील पाहूं नये. पण तुमच्या वाडिलांना मी वचन दिलं होतं—तें तुमच्याच अविचारी करणीमुळं मला पुरं करतां येत नाहीं याची जाणीव देण्याकरितांच तुम्हाला इथं बोलावलं आहे.

**हंबीरः**—महाराज ! महाराज !! साऱ्या जगानं मला देशद्रोही—गुन्हेगार असं म्हटलं असतं तरी मी त्याची पर्वा केली नसती; पण प्रत्यक्ष महाराजांच्या तोंडून—

**शिवाजीः**—मी कां म्हणूं नये ? गोरगरिबांना लुबाडलंत—दरोडे घातलेत. बायकांना फशी पाडलंत —मला दिलेलं वचन मोडलंत. आणि मानाजी-रावांवर शस्त्र उचललंत ! मग तुम्हाला देशद्रोही कां म्हणूं नये ?

**हंबीरः**—अनाथ अपंगांवर होत असलेला जुलूम नाहींसा करण्याचा प्रयत्न करणं, हा जर गुन्हा होत असेल, तर तो मी केला आहे. स्त्रियांचं शील रक्षण करण्याचा प्रयत्न करणं हा जर गुन्हा होत असेल, तर तो मी केला आहे. जुलूमामुळं देशांत भडकत चाललेली असंतोषाची आग शांत करण्याचा प्रयत्न करणं हा जर गुन्हा ठरत असेल, तर तो मी केला आहे. आपल्या आज्ञेशिवाय आपल्या लोकांवर शस्त्र उचलणार नाहीं, असं मी आपल्याला वचन दिलं होतं खरं, पण अत्याचाराची होत असलेली पराकाष्टा पाहून प्रतिकार करायला मी शस्त्र उचललं--हा जर देशद्रोह होत असेल, तर तो मी केला आहे.

**शिवाजीः**—या फाजील बडबडीनं मला नीतिमत्तेचे धडे देण्याचं साहस तुम्ही करीत आहांत. या नभाजीरावांच्या घरीं जाऊन तर तुम्ही कळसच केला आहे.

**हंबीर**:—क्षमा करा महाराज. जयंतीवर माझं प्रेम असून तिची भेट घेण्याकरितां मी नेहमीं जात असे. तसाच मी गेलों असतांना या दोघांनीं चोर म्हणून मला पकडलं.

**मानाजी**:—हंबीरराव. माझ्याबरोबर माझ्या दर्जाचा तुम्हीं जाणूनबुजून अपमान करीत आहांत !

**नभाजी**:—महाराज, हा माझा उपमर्द आहे.

**शिवाजी**:—काय म्हटलंत हंबीरराव ? नभाजीरावांच्या मुलीचं तुमच्यावर प्रेम आहे ? ही पहा ती आलीच. [ जयंती येते. ] मुली, सांग, या हंबीररावांवर तुझं प्रेम आहे ?

( जयंती मानेनेंच नकार दर्शविते. तें पाहून हंबीरराव आश्चर्य चकित होऊन )

**हंबीर**:—जयंती–जयंती. तूं देखील...महाराज आतां वेळ न गमावतां जी काय शिक्षा द्यायची असेल ती द्या. हीच माझी आपल्याला विनंती आहे.

**शिवाजी**:—लोकहो, या हंबीररावांच्या वडिलांनी स्वराज्य स्थापनेकरितां नगरच्या छाप्याच्यावेळीं आपला अमूल्य देह अर्पण करून मोठं महत्कृत्य केलं आहे त्यांच्या अलौकिक स्मृतीनं माझं हृदय भरून येत आहे, तर त्यांच्या या मुलानं स्वराज्याचा विध्वंस करण्याचा प्रयत्न केल्याबद्दल शिक्षा देण्याचा बिकट प्रसंग माझ्यावर यावा, या विचारानं माझं मस्तक अगदीं सुन्न झालं आहे. कांहीं सुचेनासं झालं आहे. मानाजीराव, तुम्हीं या तानाजीच्या मदतीनं योग्य तो निकाल द्या. मला विश्रांतीची अत्यंत जरूरी आहे.

( शिवाजी महाराज जातात. )

**मानाजी**:—( एकीकडे ) कां नभाजीराव, दैव आपल्याला अनुकूल आहे कीं नाहीं. नाहींतर महाराज चौकशी पुरी न करतांच कां निघून जावे ?

**नभाजी**:—[एकीकडे मानाजीस] आणि जयंतीची करणी पाहिलीत ना ?

**मानाजी**:—( उघड ) लोकहो ! आपल्यापुढं आलेल्या सर्व पुराव्यावरून हंबीररावांवर राजद्रोहाचा गुन्हा पूर्णपणं शाबीत होत आहे. महाराजांच्या मतानंसुद्धां ते गुन्हेगार ठरले आहेत. त्यांच्याबद्दल कुणाला कांहीं सांगायचं असेल तर त्यानं बेलाशक पुढं यावं.

**हंबीरः**—मानाजीराव, हें न्यायाचं नाटक बस करा. तुमच्या पैशानं मिंधे बनलेल्या आणि मानसन्मानानं ओशाळे झालेल्या माणसांकडून माझा न्याय मागतां ? तुमचे हे तोंडपुजे लोक तुमच्या बोलण्याला माना तुकवण्याखेरीज कसला निकाल देणार ?

**मानाजीः**—हंबीरराव, या बेताल बडबडण्यानं तुम्हीं सर्वांचा अपमान करीत आहांत. आपल्यासारख्या तरुणानं माझ्याशीं सहकार्य करण्याची सोन्यासारखी संधि गमावल्याबद्दल मला मोठा खेद वाटत आहे. आपल्यावर दया करून सोडून द्यावं असं मला अगदीं मनापासून वाटत आहे. परंतु न्यायाच्या दृष्टीनं त्याचा दुरुपयोग केल्यासारखं होईल. हंबीरराव, गुन्हा आपल्या तोंडानं कबूल करा म्हणजे न्यायाचं पावित्र्य टिकून राहील.

**हंबीरः**—मी निर्दोषी आहे. मरणाच्या अखेर घडीपयत मी हेंच बोलेत रहाणार कीं मी निर्दोषी आहे.

**मानाजीः**—लोकहो, अपराध कबूल करण्याकरितां मी यांना नानातऱ्हेनं समाजावून सांगितलं. योग्य तो मार्ग दाखविण्याचा मी शक्य तो प्रयत्न केला. पण तो यांच्या हट्टापुढं फुकट गेला हें आपण प्रत्यक्ष पहात आहांतच. यांनी केलेल्या गुन्ह्याबद्दल मी कोणतीही शिक्षा दिली तरी ती अपुरीच होणार आहे. माझ्यामतें मी यांना कडेलोटाची सौम्य सजा देतो. यांच्यासारखे राजद्रोही निमकहराम, बेइमान—

[ शिवाजी महाराज साधुच्या वेशांत गर्जना करीत प्रवेश करतात ]

**शिवाजीः**—नाहीं. नाहीं. नाहीं. हंबीरराव बेइमान-निमकहराम नसून तूं मात्र खरा निमकहराम, बेइमान, दगलबाज आहेस !

**मानाजीः**—कोण मी ? मला बेइमान म्हणणारा, दगलबाज म्हणणारा तूं कोण !

**शिवाजीः**—तुझ्यासारख्या दगलबाजांची पाळंमुळं उखडून काढणारा मी एक गोसावी आहें !

**मानाजीः**—स्वतःच्या संसाराची राख करून, साऱ्या जगाची राख करूं

इच्छिणाऱ्या गोसावड्या, तुला राजकारणांतलं काय कळतं? तुझ्यासारख्या गोसावडयांनीं राजकारणांत लक्ष घातलं कीं झालीच त्याची राखरांगोळी!

**शिवाजीः**—राज्याची राखरांगोळी निस्वार्थी गोसावडे करीत नसून, तुझ्यासारखे बेइमान लोक ती करीत असतात. जोंपर्यंत गोसावडया लोकांनीं राजकारणांत लक्ष घातलं नाहीं तोंपर्यंतच तुमच्या गमज्या चालू रहाणार! पण एकदां का गोसावडे हात धुवून मागे लागले कीं भरलीच तुमची कंबख्ती!

**मानाजीः**—शिपायांनों, पकडा या उर्मट गोसावडयाला आणि घेऊन चला या हंबीररावाबरोबर कडेलोट करायला!

[ शिपाई शिवाजी महाराजांना पकडायला जाऊं लागतात तोंच तानाजी त्यांना अडवितो. ]

**तानाजीः**—थांबा मानाजीराव, शिवाजी महाराजांच्या राज्यांत साधु पुरुषांना मरणाची सजा देतां कामा नये. निस्वार्थी साधुपुरुषांचे शाप, राज्याला घातक होत असतात. त्याचं काय म्हणणं आहे तें ऐकून घेऊन योग्य तो निवाडा करा. रागानं बेफाम बनून अविचार करायला तयार होऊं नका.

**मानाजीः**—( तडफडत ) ठीक आहे. काय रे ए गोसावडया, काय म्हणणं आहे तुझं ?

**शिवाजीः**—हे हंबीरराव गुन्हेगार नसून-खरा गुन्हेगार तूं आहेस. यांना तूं गुप्तपणानं ठार मारायचा कट केला आहेस. शिवाजीराजांना तूं कपटानं फसवूं पहात आहेस. या जयंतीवर देवीच्या देवळांत जबरदस्ती करण्याचा तूं प्रयत्न केला होतास-असे माझे आरोप तुझ्यावर आहेत.

**मानाजीः**—पकडा या बेरडाला. माझी निंदा करणाराला देहांत शासन मिळालंच पाहिजे. यावेळीं मी न्याय अन्याय मुळींच पहात नाहीं. चला, पकडा. पाहतां काय ?

( महाराजांना पकडायला शिपाई पुढें होतात तोंच कुबडीतून गुप्ती काढून महाराज लढण्याच्या पावित्र्यांत उभे राहतात. )

**शिवाजीः**—शिवाजी महाराजांच्या राज्यांत साधु लोक देहानं कमकुवत

नसून त्यांच्या अंगीं, अन्यायाला प्रतिकार करण्याइतकं क्षात्रतेज जागृत आहे.

**मानाजी**:—ढोंगी गोसावड्या, या तलवारीच्या एकाच घावानं तुझं डोकंच उडवून टाकतों. ( तलवार उपसून मारायला जातो तो महाराज आपला साधु वेश पटकन् काढून टाकून प्रकट होतात, व रागानं मानाजी-कडे पाहूं लागतात मारण्याकरितां उगारलेली मानाजीची तलवार मागच्या-मागं गळून पडते व तो जागच्याजागीं पुतळ्यासारखा स्तब्ध उभा राहून डोळे फाडून पाहूं लागतो. ] कोण महाराज ? शिवाजी महाराज ? घात झाला !

**शिवाजी**:—मानाजी, बेइमानी करून शहाजोगपण तिचं पाप दुसऱ्याच्या माथ्यावर लादायला लाज नाहीं वाटत ? तानाजी, काढ या हंबीररावांच्या बेड्या आणि चढवा याच्या हातापायांत.

**मानाजी**:—महाराज. माझ्यावर हा खोटा आरोप—

**शिवाजी**:—हा पहा तुझा दौलत तुझे खोटे आरोप खरे करून देईल.

( हिरोजी दौलतरावाला घेऊन येतो. ).

**दौलत**:—खरं आहे महाराज, तुमचंच म्हणणं खरं आहे. हे मानाजीराव खरे गुन्हेगार आहेत—मी अगदीं निरपराधी आहे.

**शिवाजी**:—मानाजी, तुला पुरावा पाहिजे आहे—पण मला कुठल्याही पुराव्याची जरुरीच नाहीं. कारण तुरुंगाच्या चौकीवर तुझे आणि या नभाजी रावाचे मला फसविण्याचे चाललेले बेत—मी स्वतः कानानं एकले आहेत. त्यावेळीं तिथल्या पहाऱ्यावर तुमचे शिपाई नव्हते, तर शिवाजी, तानाजी आणि हिरोजी, हे शिपाई बनून—तुमची कृष्णकारस्थानं पहात होते. एकत होते. घेऊन चला यांना माझ्यासमोरुन. हिरोजी, या दोघांचा एकदम कडेलोट करा.

**मानाजी**:—क्षमा करा महाराज, क्षमा करा.

**दौलत**:—महाराज, मी पायां पडतों, मला वांचवा हो वांचवा !

[ हिरोजी, मानाजीराव आणि दौलत यांना घेऊन जात आहे, इतक्यांत लक्ष्मी धांवत येऊन महाराजांचे पाय धरते. ]

**लक्ष्मी**:—महाराज, मला चुडेदान द्या. माझ्या कपाळाचं कुंकू पुसून मला करंटी करूं नका.

**शिवाजी**:—बाई तुम्हीं कोण ?

**हंबीर**:—या दौलतरावांची बायको. बिचारी मोठी साध्वी आहे. हिच्याच सांगण्यावरून मी जयंतीची सुटका करूं शकलों. हिच्याकरितां तरी याला सोडा.

**तानाजी**:—महाराज, या बाईनंच मला सारी बातमी दिल्यामुळं आपलं कार्य सफल झालं आहे. शिवाय मी तिला वचन दिलं आहे.

**जयंती**:—महाराज माझ्याकरितां तरी या बाईला चुडेदान द्या.

**शिवाजी**:—हिरोजी, या मानाजीला घेऊन जा अगोदर. ( हिरोजी मानाजीरावांना घेऊन जातो. ) बाई तुझ्या या कार्याकडे पाहून या तुझ्या नवऱ्याला मी जीवदान देत आहे. दौलत, आजपासून तू हिच्या सांगण्याप्रमाणं चाललं पाहिजे. आहे कबूल !

**दौलत**:—कबूल आहे. याच जन्मीं काय—पण सात जन्मीं देखील हिच्याच सांगण्याप्रमाणं चालेन, हें मी आपल्या पायाचीच शपथ घेऊन सांगतो.

**लक्ष्मी**:—( एकीकडे ) मिळाली का सरदारी ?

**दौलत**:—पुरे झालं, आतांपर्यंत माझं हसं झालं—तितकं आतां पुरे झालं.

**शिवाजी**:—नभाजीराव ? –

**नभाजी**:—महाराज मला क्षमा मागायला तोंडच नाहीं.

**शिवाजी**:—या तुमच्या मुलीच्या सद्‌गुणांकडं पाहून मी तुम्हांला क्षमा करीत आहे. हंबीरराव, मी मघाशीं तुम्हांला टाकून बोललों आणि भलतीं दूषणं दिलीं त्याबद्दल वाईट वाटून घेऊं नका. आणि जयंतीला मी मुद्दामच तसं सांगून ठेवलं होतं—तिचा कांहीं दोष नाहीं.

**हंबीर**:—महाराज, मी आपला अत्यंत आभारी आहें. माझ्याकरितां आपल्याला फार कष्ट घ्यावे लागले त्याबद्दल——

**शिवाजी**:—तुमच्या वडिलांना दिलेलं वचन मी आतां पुरं करतों.

[ जयंतीचा हात हंबीररावाच्या हातांत देतात. इतक्यांत प्रताप येतो. ]

**प्रताप**:—ताई, यापुढं बोलशील का माझ्याशीं ? का आपली हूँ....

**लक्ष्मीः**—ताईसाहेब, हे आपले दागिने. जप्तीच्या वेळीं माझ्याकरितां यांनीं चोरून आणले होते हे !

**हंबीरः**--वा दौलतराव !

**दौलतः**—( हात जोडून ) आतां मात्र खरंच पुरं झालं !

**शिवाजीः**--हंबीरराव–जयंतीसारखी स्वदेशाभिमानी माणसं, ज्या देशाच्या सेवेला मिळतील, त्या देशाचा भाग्योदय व्हायला मुळींच वेळ लागणार नाहीं.

**जयंतीः**— पद.

**शंकरा ॥ गिरिजावरा ॥ नटनायका ॥**
**जोडुनी करां ॥ वंदी मी तुला ॥ धृ० ॥**
**रंगली नव नाट्य—लीला ॥**
**हांसला जन तोषला ॥ १ ॥**

**समाप्त**